संगीत

# मृच्छकटिक नाटक

हें पुस्तक

## गोविंद बल्लाळ देवल,

दुर्गा, फाल्गुनराव, झुंझारराव, संगीत विक्रमोर्वशीय,
संगीत संशय-कल्लोळ, संगीत शापसंभ्रम,
संगीत शारदा इत्यादि नाटकांचे कर्ते
यांनीं रचिलें.

—*—

**आवृत्ति नववी**

**प्रकाशक,**
**विद्याधर हरि दामले**, मालक, नवीन किताबखाना,
बुधवार पेठ, पुणें सिटी.

**मुद्रक,**
रा. रा. **लक्ष्मण भाऊराव कोकाटे**, मालक, " **हनुमान** "
छापखाना, ३००, सदाशिव पेठ, पुणें.



सन १९२८

किंमत १ रुपाया.

# प्रस्तावना.

कविवर्य शूद्रकराजकृत मृच्छकटिक प्रकरणाचा आधुनिक रसिकांच्या संगीत-भक्तीस व संगीतपद्धतीस अनुसरून रंगभूमीवर प्रयोग करून दाखविण्यास, वेळेच्या व पात्रांच्या संबधानें, त्यांतल्यात्यांत सुलभ पडावें म्हणून, मीं जे त्यांत फेरफार केले आहेत, ते असे—

१ मूळ प्रकरण दशांकीं आहे; परंतु तें मी सप्तांकीं केलें.

२ कविप्रशंसा गाळून नटीसूत्रधारसंवाद थोडक्यांत आणिला.

३ द्यूतकारांचें भांडण, चंदनक व वीरक यांची परस्परांशीं मारामारी, तसेंच गोपालपुत्र आर्यक याचा प्रवेश, हे तिन्ही भाग संगीतांत अतिशय महत्वाचे न वाटल्यामुळें संबंध कमी केले. परंतु अवश्य स्थळीं त्यांचा संबंध मात्र सोडला नाहीं.

४ बहुतेक पात्रांच्या भाषणांतील अधिक सरस भाग ठेवून बाकीचा करतां आला तेथें कमी केला आहे.

५ नायिका वसंतसेनेचे विचार क्वचित्स्थळीं विस्तृत केले आहेत.

६ तिसरा व चवथा मिळून एक अंक केला; सातवा अंक तारतम्यत: अत्यावश्यकतेचा व फारसा रसाळ नसल्यामुळें समग्र गाळला; आणि सहावा व आठवा मिळून एक अंक केला.

शेवटीं इतकें सांगणें अवश्य आहे कीं, कै० परशुरामपंत तात्यांच्या भाषांतराचें मला बरेंच साह्य झालें. शकाराच्या श्लोकांपैकीं कांहीं श्लोक, व पात्रांचीं कांहीं भाषणें, हीं त्यांचींच कायम ठेविलीं आहेत.

ग्रन्थकर्ता.

---

## आवृत्ति सातवी.

पुस्तकाची सहावी आवृत्ति खपल्याकारणानें तींतील दोषस्थलें सुधारून ही आवृत्ति सचित्र छापली आहे. गंधर्व नाटक मंडळीनें आपले प्रसंगानुसार फोटो देऊन पुस्तक सर्वांगसुंदर होण्यास फार मदत केली याबद्दल सदर कंपनीचे मालक रा. रा. नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व आणि रा. रा. गणपतराव बोडस यांचे तसेंच मुंबईतील सुप्रसिद्ध फोटोग्राफर रा. रा. मोरेश्वर नारायण कीर्तिकर यांनीं फोटो काढण्यास अत्यंत परिश्रम घेतले याबद्दल त्यांचे आणि खेडकर वैद्य आणि सन्स्, पुणें यांनीं ब्लाक्स करण्याचें काम फार सुबक केलें याकरितां त्यांचे आभार मानणें अत्यंत इष्ट आहे.

सांगली,
१ डिसेंबर १९१९.

रामचंद्र गोविन्द देवल.

संगीत

# मृच्छकटिक नाटक.

## अंक १ ला.

### नांदी

पद.—( भूप—त्रिताल )

वंदन त्या ईशा उमेशा ॥ स्वजनशुभंकर नटवेशा ॥ धृ० ॥
श्रीमन्मंगलदायक नमिला ॥ स्तविली मग ती सत्कविमाला ॥
चिंतुनिया मनिं बलवंताला ॥ गोविंद रची नव कवनाला ॥
सेवा बुध हो गुणलेशा ॥ १ ॥

पद. ( काफी. चाल--साध्य नसे )

अवन करो तुमचें ॥ सदा तो आत्मसमाधी त्या शंभूचा ॥ धृ० ॥
पर्यंका दृढ रज्जु जसे ते ॥ भुजग वेष्टिती यज्ञानूतें ॥
प्राणनिरोधें झाला ॥ सकलेंद्रियगण नियमित ज्याचा ॥ १ ॥
बाह्यज्ञाना विरहित राहे ॥ निश्चलमानस होउनि पाहे ॥
अभ्यंतरिं आत्म्याला ॥ अनुभव घे जो स्वानंदाचा ॥ २ ॥

साकी.

श्यामवर्ण मेघोपम शोभे नीलकंठ ज्यावरती ॥
गौरीची भुजलता विराजे विद्युल्लेखेसम ती ॥
रक्षक तो होवो ॥ तुह्मां इच्छित फल देवो ॥ १ ॥

सूत्रधार—पुरे पुरे. सभासदांच्या कौतुकाचा भंग करणारा इतका पारश्रम कशाला पाहिजे ? ( पारिपार्श्वक जातात. ) आता सभासदांस हात जोडून माझी अशी विनंति आहे कीं,—

## साकी.

शूद्रककविकृत मृच्छकटिक जें मान्य प्रकरण लोकां ॥
संक्षेपें तें संगीतीं मी दावितसें अवलोका ॥
टाकुनि दोषांतें ॥ सेवा कविगुणलेशातें ॥ १ ॥

असो, अतिपरिश्रमानें मला फार क्षुधा लागली आहे तर घरीं जाऊन फराळाची कांहीं तरी तजवीज पहावी. ( **इकडे तिकडे फिरून** ) हें माझें गृह; तर आतां आंत जावें. ( **तसें करून** ) अरे आमच्या घरांत हें आज कांहीं नवेंच प्रकरण दिसतें. तांदुळाच्या धुवणाचे पाट रस्त्यांतून वाहताहेत, जळकी कढई ओढल्यामुळें भुईवर जी काळी रेघ उमटली आहे तेणेंकरून वैष्णवाची मुलगी कपाळा अंगाऱ्याची रेघ लावून जशी शोभते तशी ही भूमि फारच शोभते आहे. हा घरांतून भाताचा जो घमघमाट येतो आहे त्याच्या योगानें तर माझी क्षुधा अधिकच प्रदीप्त होऊं लागली. हें आज आहे तरी काय?—

**पद. ( चाल—पूर्ण दैव कैकइचें आजि उदेलें )**

थाटमाट सदनिं नवा बघुनि वाटतें ॥
पूर्वपुण्यफल मजला आज लाभतें ॥ धृ० ॥
घाशितसे चंदन ही कोणि कामिनी ॥
वाटी हे अंगराग कोणि बैसुनी ॥
कुसुमहार गुंफित ही लक्ष लावुनी ॥
रम्य रंगवल्लि इथें कोणि काढिते ॥ १ ॥

—तर आतां भार्येलाच हांक मारून विचारावें म्हणजे खरें काय आहे तें समजेल. [ **पडद्याकडे पाहून** ] प्रिये, जरा इकडे ये पाहूं.

**[ नटी येते ]**

**नटी**—पतिराज, ही मी आलें; काय आज्ञा आहे?

**सूत्र०**—दुसरी कांहीं नाहीं. मी फार वेळ गात बसलों होतों त्यामुळें माझीं गात्रें पहा कशीं सुकून गेलीं आहेत. तर घरांत कांहीं फराळाचें आहे काय?

**नटी**—सर्व कांहीं आहे महाराज.

**सूत्र०**—काय काय आहे सांग पाहूं?

नटी---आपला आवडता गूळभात, चक्कादहीं, मसाल्याचे खमंग तांदूळ, निर्लेप आमटी, वडे, खीर-ईश्वरकृपेनें सर्व कांहीं आहे.

सूत्र०--[ आशेनें ] प्रिये, खरेंच कां इतकें सारें आपल्या घरांत आहे ?

नटी--[ आपल्याशीं ] आतां थोडीशी थट्टा करण्याला ही वेळ बरी आहे. [ उघड ] प्राणप्रिया, आपल्या घरांत नाहीं. हें सारें बाजारांत पक्कान्यांच्या दुकानीं मिळतें.

सूत्र०--[ कोपानें ] हा दुष्टे ! माझ्या आशेचा तूं भंग केलास तर तुझ्याही आशेचा असाच भंग होईल.

नटी--

ठुंबरी ( चाल---लगाये जियेरा. )

इतुके कां कोपला ॥ क्षमा करा या दासीला ॥
प्रिया ॥ धृ० ॥ सहज विनोदें बोलुनि गेलें ॥
राग कसा आला ॥ तुम्हांला ॥ १ ॥

सूत्र०--[ शांत होऊन ] बरें पण, हा एवढा थाटमाट कशाचा ?

नटी--आज मी कांहीं व्रत घेतलें आहे.

सूत्र०—व्रत घेतलेंस ? नांव काय त्याचें ?

नटी—त्याचें नांव अभिरूपपति, म्हणजे त्याच्या योगानें विद्वान् पति मिळतो.

सूत्र०—या लोकचा कीं परलोकचा ?

नटी—परलोकचा.

सूत्र०—[ रागावून ] पहाहो, माझा भात खर्चून परलोकचा पति मिळावा म्हणून ही व्रत करिते ! कोणीं सांगितलें गे तुला हें व्रत करावाला ?

नटी०--प्राणनाथ, आपलाच प्रियमित्र जो चूर्णवृद्ध त्यानें सांगितलें.

सूत्र०--[ कोपाविष्ट होऊन ] अरे अधमा चूर्णवृद्धा—

साकी.

जैसें विधिनें कापावें नववधूकेशपाशांतें ॥
तैसें नृपपालकें कापितां नीचा तव कंठातें ॥
पाहिन मी जेंव्हां ॥ होइन तुष्टात्मा तेव्हां ॥ १ ॥

**नटी०--[ नम्रपणानें हात जोडून ]** पतिराज, हें काय ?

**कामदा.**

**लाभ आपुला व्हावयास हा ॥ व्रतनियोग मीं सेविला पहा ॥**
**म्हणुनि विनवितें शांतवा मना ॥ विप्र बोलवा एक भोजना ॥ १ ॥**

**सूत्र०----[ शांत होऊन ]** असें काय, हें मला काय ठाऊक ? बरें तर तूं आपल्या कामाला जा. मीहि आपल्या घरीं येण्यासारखा एक चांगला ब्राह्मण बोलावून आणतों.

**नटी**—आज्ञा. [ जाते ]

**सूत्र०---[ इकडे तिकडे फिरून ]** कसें करावें बरें ? हें उज्जयिनी नगर तर ब्राह्मणांनीं भरलें आहे. पण यांत योग्य, सत्पात्र, सुशील असा ब्राह्मण कोठें पहावा ? [ **पुढें पाहून** ] बरें झालें, हा चारुदत्ताचा मित्र मैत्रेय इकडे येत आहे, त्याला विचारून पहावें. अरे मैत्रेया, तूं आज आमच्या घरीं भोजनाला येशील का ?

**मैत्रे०--[ पडद्यांतून ]** बाबारे, मी सध्यां कामांत आहे. मला काहीं यायला होणार नाहीं. तूं दुसरा कोणी ब्राह्मण पहा.

**सूत्र०**—अरे नाहीं कां म्हणतोस ? आजचें भोजन उत्तम प्रकारचें चमचमीत आहे, तुला कोणचीही अडचण नाहीं, आणि दक्षणाही चांगली मिळेल. पहा.

**मैत्रे०-- [ पडद्यांतून, त्रासून ]** कायरे तुला पहिल्यानेंच सांगितलेंना कीं मला यायला होणार नाहीं म्हणून, मग मलाच येण्याविषयीं तुझा इतका आग्रह कां ?

**सूत्र०**—यानें तर मला धुडकावलें. असो दुसरा ब्राह्मण पाहूं [ **जातो** ]

**मैत्रे०**—[ **प्रवेश करून** ] शिव शिव ! या मैत्रेयानें दुसऱ्यांचीं आमंत्रणें कां खावीं ? काय अवस्था प्राप्त झाली हीं ! अवस्थे, तूं आमची फार चांगली परीक्षा केलीस. दैवाची गति काय विलक्षण पहा ! जो मी मैत्रेय नुकताच चारुदत्ताच्या सम्पत्तीवर मौजा मारीत होतों; ढेकराबरोबर सुगंध देणारे असे मसालेदार मोदक खाऊन, मधल्या चौकाच्या दारांत स्वस्थ बसत होतों; चिताऱ्याचीं बोटें जशीं अनेक प्रकारच्या रंगांनीं भरलेलीं असतात तसे माझे हात नानाप्रकारच्या पक्वान्नानीं भरलेले असत. कंटाळा आला

म्हणजे बोटाचा स्पर्श मात्र करून पात्रांतील पदार्थ पलीकडे सारीत होतों; रस्त्यांत पोळ जसे रवंथ करीत उभे राहतात तसा मी बेफिकीर रहात होतों; तोच मी मैत्रेय माझ्या मित्राला दरिद्रता आली म्हणून दिवसा इकडे तिकडे कोठें तरी आपला निर्वाह करून रात्रीं वस्तीला मात्र त्याच्या घरीं येतों. असो, चारुदत्ताचा प्रिय मित्र जो चूर्णवृद्ध त्यानें हा शेला जाईच्या फुलांनीं सुवासित करून त्याला देण्याकरितां माझ्यापाशीं दिला आहे, तर तिकडेच जावें [ इकडे तिकडे फिरून पुढें पाहून ] हा पहा चारुदत्त स्नानसंध्या आटोपून गृहदेवतांना बलि देण्याकरितां इकडेच येत आहे.

( चारुदत्त प्रवेश करतो. )

चारुदत्त—[ आकाशाकडे पाहून दुःखाचा सुस्कारा टाकून ]—

पद. ( त्रिताल. )

**सार्थिची ते वर्ती ॥ लोकीं ॥ प्रारब्धाची गति न कळे ती ॥ धृ० ॥**
**मारसादि जे बलि भक्षुनिया ॥ क्रीडत होते सदनांगणिं या ॥**
**वाढे सांप्रत तृण त्या ठाया ॥ पुण्यबली हा कीटक खाती ॥ १ ॥**

मैत्रे०—[जवळ जाऊन ] मित्रा, तुला स्वस्ति असो, तुझी अभिवृद्धि होहो.

चारु०—मित्रा मैत्रेया आलास, फार चांगलें झालें. ये बैस खालीं.

मैत्रे०—[ बसून ] मित्रा, तुझा प्रियमित्र जो चूर्णवृद्ध त्यानें हा शेला जाईच्या फुलांनीं सुवासित करून तुला देण्याकरितां दिला आहे. तर हा घे.

चारु०—[ शेला घेऊन सचिंत बसतो. ]

मैत्रे०—अरे चिंतन कसलें करतोस ?

चारु०—मित्रा, काय सांगू—

दिंडी.

**दुःख भोगुनि मग सेवितां सुखातें ॥**
**अंधकारीं दीपसें तोष देतें ॥**
**परी सौख्या भोगोनि दुःख येतां ॥**
**सतनु परि तो मृत मनुज जाण ताता ॥१॥**

मैत्रे०—बरे मित्रा, दारिद्र्य आणि मरण यांतून तुला कोणते बरे वाटतें?

चारु०---

ठुंबरी. ( चाल---बैरागी मोरे राम. )

मरण बरें वाटतें ॥ दारिद्र्याहुनि मित्रा तें ॥ धृ० ॥
दुःख एकदां त्या मरणाचें ॥ परि होतें जें दारिद्र्याचें ॥
सतताचि तें जाळितें ॥ १ ॥

मैत्रे०---हें बघ, त्या गोष्टीचा आतां खेद मानूं नकोस; तुझें द्रव्य कांहीं चोरांनीं चोरिलें नाहीं कीं राजानें लुटलें नाहीं; आपल्याच इष्टमित्रांना देतां देतां क्षीण झालें आहे; म्हणून देवांनीं अमृतकला पितां पितां अवशिष्ट राहिलेल्या प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें तुझ्या वैभवाचा क्षय तुला अधिकच शोभतो.

चारु०---मित्रा,--

पद, ( चाल---लाल झाली कोपानें, )

वैभव माझें नष्टचि झालें खेद नसे त्याचा मजला ॥
दैवबळानें मिळते अथवा पावतसे तें विलयाला ॥ धृ० ॥
परि कथितो तुज हृदयीं माझ्या दुःखाचें जें बीज सलें ॥
निर्धन ऐसा झालों जाणुनि मित्रांनीं मज सोडियलें ॥
मद जाउनि गजगंडस्थळ तें शुष्काचि होतां बहुकालें ॥
भृंगतती त्या सोडुनि जैसें सेवितात कीं अन्याला ॥ १ ॥

मैत्रे०-अरे ते मित्र म्हणजे गोमाशा; त्यांच्याबद्दल तुला इतकें वाईट नें कां वाटतें ?

चारु०---[ सुस्कारा टाकून ] मित्रा कायरे ही निर्धनता ! इच्या पासून काय काय अनर्थ घडतात पहा. —

पद. ( चाल-अर्धतनु वारुळी बुडाली. )

निर्धनतेनें लज्जा निपजे मनुजाच्या अंतरीं, लज्जा तत्तेजातें हरी ॥ होतां तेजोहीन तयाला कोणी नच आदरी, लोकीं मानहानि बहु-परी ॥ जीवित निष्फळ वाटे तेणें मनिं शोकातें करी, शोकें जाय बुद्धि ती दुरी ॥ बुद्धिरहित नर नाश पावतो सर्वां कारण परी, तयाची निर्धनता वा खरी ॥ चाल ॥ या निर्धनतेच्या ठायीं चिंता वसे ॥ परवैरा कारण इजसम दुसरें नसे ॥ इजमुळें मित्रगण निंदापर

होतसे ॥ चाल ॥ सेवाया वन बुद्धि निपजवी भार्या छळिते घरीं, तापद वन्हिच हा म्हणुं तरी ॥ १ ॥

—असो, दैव आपलें! मित्रा मीं, गृहदेवतांना बलि दिला. आतां हा मातृदेवतांचा बलि तूं चव्हाट्यावर नेऊन ठेव.

मैत्रे०—मी ठेवायचा नाहीं.

चारु०—कां बरें?

मैत्रे०—कां बरें म्हणजे, आराधना केली आणि कांहीं केलें, तरी देवता कांहीं प्रसन्न होत नाहींत; मग त्यांना बलि तरी कां द्या?

चारु०—मित्रा, असें म्हणूं नकोस. हा गृहस्थांचा नित्यविधि आहे. हा केलाच पाहिजे. याच्या योगानें देवता प्रसन्न होऊन प्रसाद करितीलच. तर जा आणि मातृदेवताना बलि देऊन ये.

मैत्रे०—मी जायचा नाहीं, तूं दुसऱ्या कोणाला पाठीव. कारण मी गरीब ब्राह्मण, मला नाहीं काळ अनुकूल. आरशांतल्या प्रतिबिंबांत जसें उजव्याचें डावें आणि डाव्याचें उजवें होतें, तसें जें जें म्हणून मी करायला जातों तें तें सारें उलटें होतें. इतकें असून तूं सांगतोस म्हणून गेलों असतों; पण ही संध्याकाळची वेळ, रस्त्यांतून वेश्या, वीट, चेट, तशींच राजाच्या प्रीतींतलीं दुसरीं मनुष्यें इकडून तिकडे हिंडत आहेत; तेव्हां न जाणो, बेडूक खायाला उत्सुक झालेल्या काळसर्पापुढें जसा अकस्मात् उंदीर पडावा, तसा मी त्यांच्या पुढें पडलों तर फुकट मरेन कीं नाहीं बरें? मग तूं येथें एकटा बसून काय करशील?

चारु०—[ दुःखानें ] बरोबर आहे. मी निर्धन पडलों म्हणून तूं असें म्हणतोस; तुझ्याकडे तरी काय दोष?—

## साकी.

ब्राह्मणहत्या मद्यप्राशन चौर्यहि तैसें तिसरें ॥
गुरुभार्येशीं गमन कुसंगति ऐशीं पापें बा रे ॥
निर्धनता वाटे ॥ सहावें पातक हें मोठें ॥ १ ॥

—[ सुस्कारा टाकून ] मित्रा दारिद्या!—

### दिंडी.

सौख्य मानुनि बहु वससि मम शरीरीं ॥ कींव मित्रा परि येत तुझी भारी ॥ पुढें कालानें मरण मला येतां ॥ कुठें जाशिल तूं हीच मनीं चिंता ॥ १ ॥

**मैत्रे०**–[ **वाईट वाटून** ] तुला इतकें वाईट वाटत असेल तर जातों बापडा, पण एकटा नाहीं जायचा. रदनिकेच्या हातांत दिवा देऊन तिला बरोबर घेईन आणि मग जाईन.

**चारु०**–बरें तर ती कोठें आंत असेल तिला घेऊन जा. तोंपर्यंत माझा कांहीं जप उरला आहे तो मी संपवितों. [ जातो. ]

**मैत्रे०**–आतां रदनिका कोठें सांपडेल बरें? [ **पडद्याकडे कान देऊन** ] अंः, असेल कांहीं रस्त्यांतला दंगा. आपण आपल्या कामाला जावें.

[ जातो ]

( पुढें वसंतसेना, व तिच्या पाठीस लागलेले
विट, चेट व शकार असे येतात. )

**विट**–वसंतसेने, उभी रहा.–

### दिंडी.

नृत्ययोग्यचि मृदु चरण असुनि त्यांसी ॥ धांवण्याचे कष्ट कां व्यर्थ देसी ॥ हरिणि जैसी लागतां व्याघ्र मागें ॥ अम्हां पाहुनि तूं पळसि तेंवि कां गे ॥ १ ॥

**चेट**–अग ए वसंतसेने, उभी रहा.–

### लावणी.

नग पळून जाउं तूं नारीं ॥ जरा थांब फीर मागारी ॥ धृ० ॥
ज्यो मोर तूं मोरिन ॥ कां जातिस त्येला टाकून ॥ १ ॥
माग लागून माजा धनी ॥ आला धांवत कुत्र्यावानी ॥ २ ॥

**शकार**–अगे वसंतसेने, उभी रहा. अगे अशी धाऊं नकोस. अशी पळूं नकोस. अगे माझ्यावर जर सुप्रसन्न झालीस तर मरायची नाहींस. हें बघ, मासाचे तुकडे जसे निखाऱ्यावर पडले म्हणजे जळतात, तसें हें माझें हृदय

कामसंतापानें जळत आहे. तर तूं माझ्यावर सुप्रसन्न हो गे. अगे हें बघ, तुला पाहून माझा अनंग, माझा काम, माझा स्मर, माझा मन्मथ, हे सारे एकदम वाढले कीं ग. रात्रीं सुस्कारे सोडीत शय्येवर पडतों, पण स्वप्नांत सुद्धां बघ झोंप येत नाहीं. म्हणून रावणाला जशी कुंती वश झाली, तशी तूं माझ्यावर सुप्रसन्न हो गे. वसंतसेने, तूं कशी सुरेख मदनाची छडी आहेस, चोर आहेस, मांसे खाणारीण आहेस, शृंगाररसाची पेटी आहेस, सुंदर नाचणारीण आहेस, सुवसना आहेस, आणि तुझें नाक कसें चपटें आहे! तर तूं माझ्यावर सुप्रसन्न हो कीं ग. मित्रा, विटा, मीं हिला इतकी चांगली चांगली म्हणून नांवाजली तरी ही माझ्याबर सुप्रसन्न कां रे होत नाहीं ?

**विट**—वसंतसेने, तूं मुकाट्यानें उभी रहा, माझ्यापुढें किती बरें पळशील?

**शकार**—मित्रा, विटा, हिच्या भूषणांचा झणझण खणखण असा गोड आवाज ऐकूं येतो नाहीं बरें ? वसंतसेने, रामाला भिऊन जशी द्रौपदी पळाली तशी तूं मला भिऊन पळून जातेस, काय, बरें आहे—

## श्लोक.

**विश्वावसूची भगिनी सुभद्रा ॥ नेली जशी मारुतिनें समुद्रा ॥**
**तशी तुला मी धरितो पहागे ॥ जातीस कोठें फिर शीघ्र मागें ॥ १ ॥**

**चेट**—अग ए वसंतसेने, ह्ये आमचं महाराज, राजाच्या लइ मर्जीतलं हायती. अस येडया बायकुवानी कां करतिस ? येना राजी झालीस तर तुजग काय ग्येल ? आयत रगडून मास खायला मिळेल, दागिन बी गावत्याल, अन ह्ये बघ—

## लावणी.

**तरनि जान तूं बिजलीवानी, पोपट आमच धनी, होऊन बस ग मैना रानी ॥ १ ॥ लइ गुलहौसी गडि मर्दानी ॥**
**तुजीचि भरजानी, आलि रंगाला; अग नागिनी ॥ २ ॥**
**नग भरगच्चा झुपका नथनी, घालुन मुरका हानी, भार पदर मग खुप साजनी ॥ ३ ॥**

**शका०**—अगे वसंतसेने, रानांत जसे कुत्रे कोल्हीच्या पाठीस लागतात

तसे आम्ही तुझ्या पाठीस लागलों असतां तूं माझें हृदय चोरून पळून जातेस काय ?

**वसंत०:**—अगे पल्लविके ! अगे परभृतिके !

**शकार०**—( **भय पावून** ) अरे मित्रा विटा, कोणी माणसें आलीरे माणसें आलीं.

**विट**—थांब, मी ऐकतों.

**वसंत०**—माधविके, अगे माधविके !

**विट**—हा मूर्खा, अरे ती आपल्या दासींना हांका मारीत आहे.

**शका०**—काय ती बायकास हाका मारीत आहे कां ?

**विट**—तर काय.

**शका०**—अं: एक सोडून शंभर बायकांस कां हांका मारीना ! मी या मोठ्या सोट्यानें त्या सर्वांस ठार मारीन.

**वसंत०**—( **जवळ कोणी नाहीं असें पाहून** ) अगबाई ! कोणी जवळ नाहीं ! या दासी चुकल्या वाटतें. तर आतां येथें मींच आपलें रक्षण करावें, असें झालें.

**विट**—शोध, शोध, आपल्या दासींना आणखी शोध.

**शका०**—वसंतसेने, तूं पल्लविकेस हांका मार, परभृतिकेस हांका मार, पाहिजे तर साऱ्या वसंतमासाला हांका मार ! पण मी तुझ्या पाठीस लागलों असता तुला कोण सोडवितो पाहूं—

## श्लोक.

**तो भीम कीं तो जमदग्निपुत्र ॥ कीं येउ कुंतीसुत पंचवक्त्र ॥**
**तुझा पहा मीं बुचडा धरीतों ॥ दुःशासनाची करणी करीतों ॥ १ ॥**

—वसंतसेने, अशी जर धडपडलीस तर या तीक्ष्ण तरवारीनें तुझी मानच कापीन बघ ! ( **हंसून** ) अगे अशी भिऊं नकोस; अशी घाबरूं नकोस, मुकाट्यानें वश हो. अगे काळाला आमंत्रण करून कशी वांचशील बरें ?

**वसंत०**—आर्या विटा, मी अबला स्त्री आहें.

**विट**—म्हणून जिवंत राहिलीस.

**शका०**—आणि म्हणूनच मेली नाहींस !



शकारः—या तीक्ष्ण तरवारानें तुझी मानच कापीन बघ. (पृ. १०)

**वसंत०**—याचें दयेचें भाषण ऐकून देखील मला भयच वाटतें. ( उघड ) आर्यश्रेष्ठा, या तुमच्या करणीवरून मला असें दिसतें, कीं माझे हे अलंकार घ्यावे असें तुमच्या मनांत आहे.

**विट**—छे छे, असें मनांत देखील आणूं नकोस. अगे, बागेला शोभा देणारी जी लता तिचीं फुलें कां कोणी तोडितो ? तुझे अलंकार आम्हांला काय करायचे ?

**वसंत०**—तर मग हें काय असें करितां ? मनांत तरी काय आहे तुमच्या ?

**शका०**—अग मी सांगतों. मी वरपुरुष, मनुष्य वासुदेव, थोर म्हणून माझ्या मनांत जो हेतु आहे तोच तूं पूर्ण करावा हेंच आमचें म्हणणें आहे आणि दुसरें गे काय ?

**वसंत०**—( **रागावून** ) शिव शिव, काय बोलतोस हें ? हो एकीकडे, हें बोलणें तुला शोभत नाहीं.

**शका०**—मित्रा विटा, ही कलावंतिणीची पोरटी मनांतून या वरपुरुषावर सुप्रसन्न होऊन म्हणते 'एकीकडे चल,' आणि म्हणते, 'तूं थकला आहेस, भागला आहेस.' खरेंच गे वसंतसेने, तुझ्या पाठीस लागलागून मी अगदीं दमून थकून गेलों आहें, हें तूं खरें ओळखलेंस.

**विट**—( **मनांत** ) वाहवा ती काय बोलली आणि हा मूर्ख काय समजला ! ( उघड ) वसंतसेने, तूं हें वेश्यापणाला अगदीं विरुद्ध बोललीस .—

## साकी.

**तनुविक्रय तूं करिसि धनास्तव योग्य न हें मग तुजला ॥**
**तरुण सधन जन येत असावे नित्याचि निज सदनाला ॥**
**मनिं हें दृढ वाहीं ॥ प्रिय अप्रिय जन सम पाही ॥ १ ॥**

—आणखी पहा—

## पद. ( चाल—कैसा भेख बनायावे )

**शूद्र विप्रवर मूर्ख चतुर नर स्नान कराया जाती ॥**
**एका वापिमधें म्हणुनि कां दोषास्पद ती होती ॥**
**तैसी सुंदर तूं गणिका ॥ भोग्या असासि सर्व लोकां ॥ १ ॥**

विप्र क्षत्रिय वैश्यहि एका नौकेमाजीं बसती ।
मयूर वायस एक लतेवरि बैसुनि विश्रम घेती ॥
तैसी सुंदर तूं गणिका ॥ सेव्या असति सर्व लोकां ॥ २ ॥

**वसंत०**—अरे गुण हाच प्रीतीला कारण आहे, बलात्कारानें प्रीति होत नाहीं, समजलास ?

**शका०**—अरे मित्रा विटा, कामदेवाच्या उत्सवासाठीं बागेंत यात्रा जमली होती, त्या दिवसापासून ही गर्भदासी, त्या भिकारड्या चारुदत्तावर अनुरक्त झाली आहे म्हणून माझ्यावर सुप्रसन्न होत नाहीं. पण सांभाळ बरें! त्या चारुदत्ताचें घर जवळच डाव्या हाताला आहे; तर ती तुझ्या हातून सुटून जाणार नाहीं असें कर, आणि माझ्या हातून सुटून जाणार नाहीं असेंही कर.

**विट**—[ **मनांत** ] वाहवा, जी गोष्ट मनांत ठेवायची तीच हा मूर्ख उघड करून बोलतो. काय म्हणावें याला ! असो. वसंतसेना चारुदत्तावर अनुरक्त झाली असें हा म्हणतो. योग्यच झालें. रत्नापाशीं रत्न गेलें. [ **उघड** ] कायरे काणेलीपुत्रा, काय म्हणतोस ? जवळच डाव्या हाताला चारुदत्ताचें घर आहे ?

**शका०**—अरे हो हो ! हा वरपुरुष कधीं खोटें बोलला आहे का ? अरे हें बघ जवळच डाव्या हाताला त्याचें घर आहे.

**वसंत०**—( **मनांत** ) फार चांगलें झालें. डाव्या हाताला त्याचें घर आहे असें हा म्हणतो हें जर खरें असेल, तर हा दुष्ट अपकार करीत असतां यानें हें घर दाखवून माझ्यावर उपकारच केला असें मी समजेन. कारण यानें माझी आणि माझ्या प्रियाची गांठ घातली.

**शका०**—अरे विटा, उडदाच्या ढिगांत जशी काजळाची गोळी दिसत नाहीं, तशी वसंतसेना, दिसतां दिसतां एकदम दिसेनाशी झाली. कितीरे काळोख हा.

विट—खरेंच. —

**पद. ( चाल—शैवालें युक्त जैसें. )**

**नभ वर्षे तिमिरधारा भूवरिसें दीसतें ॥**
**उघडे हे नेत्र माझे परि मिटले वाटतें ॥**

दृष्टीची शक्ति सारी बघ येथें लोपते ॥
जैसी ती कुजनसेवा निष्फलता पावते ॥ १ ॥

शका०–विटा, आतां मी वसंतसेनेला शोधून काढतों.

विट–अरे पण तिची कांहीं खूण आहे का ?

शका०–खूण ती कसली बरें ?

विट–तिच्या अंगावरील भूषणांचा शब्द व फुलांचा सुगंध.

शका०–नाकास फुलांचा वास ऐकूं येतो, पण अंधकारानें हे माझे कान भरले आहेत; म्हणून भूषणाचा शब्द कांहीं स्पष्ट दिसत नाहीं !

विट–अगो वसंतसेने, —

## साकी.

मेघाच्छादित चपलेसम तूं नच दिसशी कवणाला ॥
पुष्पगंध तव नूपुररवही सुचविल परि तो तुजला ॥
ऐके चतुरवरे ॥ माझें वच हें उमज खरें ॥

शका०–अरे, असें रागानें बोललास तर ती भिऊन जाईलरे.

वसंत०–हो खरेंच. [ नूपूर वगैरे काढून हातांत घेते व फुलें एकीकडे फेंकून देते. ] हं काय ! भिंत चाचपतां चाचपतां हें परसदार माझ्या हाताला लागलें वाटतें ? हो दारच; हें बंद आहे पण—

[ हातांत दिवा घेऊन रदनिका प्रवेश करिते. ]

वसंत०–अग बाई ! माझ्या नशिबानें दार तर उघडलें. पण या दिव्याला—काय करावें ? [ पदरानें दिवा मालवून आंत जाते. ]

मैत्रे०–( प्रवेश करून ) अरे दिवा कशानें गेला ? रदनिके, घालविलास दिवा !

रदनिका–मी काय करूं ? वारा आला आणि दिवा गेला.

मैत्रे०–बरें तूं बाहेर उभी रहा, मी चौकांतून दिवा घेऊन येतों. [जातो.]

शका०–विटा, आतां मी वसंतसेनेला शोधून काढितों.

विट–हं, काढ.

शका०–[ इकडे तिकडे चांचपून ] विटा, धरलीरे धरली.

विट–हा मूर्खा, धरलीस काय ? मी तो विट.

**शका०**–तूं विट का? तर हो एकीकडे. [ **पुनः शोधून** ] धरलीरे धरली, आतां मात्र खास धरली!

**चेट**–महाराज, ती नव्ह, चेट है ह्यो.

**शका०**–तूं चेट का? हें कायरे, इकडे जावें इकडे विट, तिकडे जावें तिकडे चेट, इकडे विट, हें आहे तरी काय? तुम्ही दोघेही एकीकडे व्हा कसे; मी आतां तिलाच शोधून काढितों [ **चांचपून रदनिकेची वेणी धरून** ] मिळा विटा, आतां मात्र खास खास धरली!

## श्लोक.

**होती काळोखांत दडाली ॥ मालागंधें खूण दाविली ॥**
**केशीं धरिली या पठ्ठयानें ॥ रुक्मिणी जैशी दशकंठ्यानें ॥१॥**

**विट**—खरोखरीच सांपडली कायरे? पळून जात होती नाहीं? अगे वसंतसेने—

## साकी.

**यौवनदर्पे भाळलीस त्या सार्थवाहपुत्राला ॥**
**परि मम मित्रें केशीं धरिली हरण कराया तुजला ॥**—

**शका०**–[ मध्येंच ]

**आतां कोठें पळशिल पोरी ॥ धरिला वेणी बुचडा दोरी**
**ओरड मार हाका देवातें ॥ शंभू शंकर ईश शिवातें ॥ १ ॥**

**रद०**—( **भय पावून** ) तुम्ही थोर मनुष्य, असें काय करितां हें?

**विट**—मिळा, अरे हा शब्द निराळा दिसतो, वसंतसेनेचा नव्हे.

**शका०**—अरे तुला समजत नाहीं. दहींभात खाऊन सोकलेल्या मांजरीचा जसा स्वर बदलतो, तसा हिनें स्वर बदललेला आहे.

**विट**—काय, स्वर बदलला म्हणतोस? मोठेंच आश्चर्य हें! अथवा आश्चर्य कसलें? एवढें गायला शिकली, एवढें नाचायला शिकली, लोकांना फसविण्याच्या कामीं इतकी कुशल, तिनें स्वर बदलला यांत काय नवल?

[ मैत्रेय हातांत दिवा घेऊन प्रवेश करतो ]

**मैत्रे०**—ओहोहो! प्रदोपकाळच्या मंद वायूनें हा दिवा पहा कसा कांपतो आहे! वधस्तंभापाशीं नेलेल्या बोकडाचें काळीज असेंच कांपत असतें.

[ पुढें होऊन रदनिकेची स्थिति पाहून ] रदनिके !

शका०---( भय पावून ) विटा, कोणी माणूसरे माणूस !

मैत्रे०---रदनिके, चारुदत्त दरिद्री झाला म्हणून त्याचा धाक न बाळगतां परका पुरुष घरांत आणतेस, हें चांगलें नव्हे.

रद०---अहो मैत्रेय, माझी आधीं दुर्दशा तरी पहा. बघा यानें मला कसें धरिलें आहे !

मैत्रे०---[ क्रोधानें काठी उगारून ] काय करितोसरे ? हो एकीकडे. कुत्रा देखील परक्याला आपल्या धन्याच्या घरांत थऊं देत नाहीं; मग मी तर मनुष्य--त्यांत ब्राह्मण--मग मी गप बसेन काय ? आम्हांसारख्या दुर्दैव्यांच्या नशिबाप्रमाणें किंवा तुम्हासारख्या दुर्जनांच्या हृदयाप्रमाणें हें वाकडें लांकूड आहे, यानें तुझें डोकेंच फोडून टाकितों !

विट---हे महाब्राह्मणा, क्षमा कर.

मैत्रे०---[ विटास पाहून ] ह्याचा अपराध दिसत नाहीं. [ शकारास उद्देशून ] हाच अपराधी आहे. अरे राजशालका, संस्थानका, दुर्जना, जरी श्रेष्ठ चारुदत्त द्रव्यहीन झाला तरी त्याचे गुण काय सर्व उज्जयिनी नगरीला माहीत नाहींत ? तेव्हां त्याला तुच्छ मानून त्याच्या घरांत शिरून, त्याच्या परिजनांशीं अशी दांडगाई करितोस ? काय म्हणावें तुला ?

विट---महाब्राह्मणा, क्षमा कर म्हटलेंना ? दुसऱ्या एका स्त्रीच्या भ्रांतीनें आम्हांकडून ही चूक झाली. केवळ दांडगेपणानें किंवा चारुदत्ताचा उपमर्द करावा म्हणून झाली, असें नाहीं. हें पहा भटजीमहाराज, जिचा आमच्याकडे डोळा, तिलाच आम्ही शोधितों; भलतीच्याच वाटेला आम्ही कसे जाऊं बरें ?

मैत्रे०---मग ही तशी आहे का ?

विट---छेः छेः, नुकती दुसरी एक स्त्री येथून गेली, तिच्या भ्रांतीनें आम्हांकडून ही चूक झाली. तर सर्व प्रकारें आम्ही तुम्हाला शरण आहों. ही गोष्ट चारुदत्ताला कळविणार नाहीं, असें वचन द्या. [त्याचे पाय धरतो.]

मैत्रे०---बरें, हें घे वचन; नाहीं सांगायचा.

**विट**—[ उठून ] भटजीमहाराज, खऱ्या गुणांपुढें आमच्या गर्वाचें काय चालणार आहे ?

**शका०**—[ ईर्ष्येनें ] कायरे विटा, कशाकरितां या म्हतारड्या भटुरग्याच्या मोठ्या विनयानें पायां पडलास ?

**विट**—भ्यालों म्हणून.

**शका०**—कोणाला भ्यालास ?

**विट**—त्या श्रेष्ठ चारुदत्ताच्या गुणाला.

**शका०**—अंः; आतां कशाचेरे त्याचे गुण ! त्याच्या घरांत एक घासभर अन्नसुद्धां कोणाला मिळत नाहीं, मग गुण ते कोणते !

**विट**—अरे असें म्हणूं नकोस. उन्हाळ्यांत पुष्कळ लोकांची तृषा भागवून जसा एखादा तलाव शुष्क होतो, त्याप्रमाणें त्या श्रेष्ठ चारुदत्ताची स्थिति आहे.

**शका०**—तूं एवढी जी त्याची प्रतिष्ठा सांगतोस, असा कोणरे हा रांडलेक ? कोणत्यारे बटकीच्या पोटचा ?

**विट**—मूर्खा, तो नांवाचा श्रेष्ठ चारुदत्त आहे, त्याची बरोबरी कोण करणार ?—

**पद.** ( चाल--अष्टमूर्ति परमेश० )

दीनजनांचा कल्पतरुचि जो साह्य सज्जनांचा ॥
विद्याविनयें नम्र सदा किति कोष सद्गुणांचा ॥ धृ. ॥
सदाचरणरत जननिकषाचि आदर्श शिक्षितांचा ॥
मर्यादेचा सागर आदर राखी सकलांचा ॥
सुहृज्जना संतोषदायि बहु निधि औदार्याचा ॥
ऐसा सद्गुणमणिमंडित जो धन्य जन्म त्याचा ॥ १ ॥

—एवढ्याकरितां आपण येथून जावें हें फार चांगलें.

**शका०**—वसंतसेनेला घेतल्याशिवाय ?

**विट**—अरे, ती तर तुला केव्हांच सोडून गेली.

**शका०**—ती कशी गेली रे ?

**विट**—कशी गेली सांगूं ! जशी अंधळ्याला दृष्टि सोडून जाते, अथवा

मूर्खाला बुद्धि सोडून जाते, तशी ती तुला सोडून गेली समजलास ? म्हणून आपणही जाऊं चल.

शका०--कसेंही असो, वसंतसेनेला घेतल्याशिवाय मी इथून हलायचा नाहीं.

विट--अरे मूर्खा, पण तुला हें कसें नाहीं कळत, कीं--

## कामदा.

स्तंभबंधनें होत वश करी ॥ वाजी होय तो रज्जु मुखिं जरी ॥
लुब्ध कामिनी व्हावया नरा ॥ हेतु हृदयिंचा प्रेम गुण खरा ॥ १ ॥

--म्हणून मुकाट्यानें जावें हें बरें.

शका०--तुला जायचें असेल तर तूं जा; मी तिला घेतल्याशिवाय येथून हलायचा नाहीं.

विट--बरें तर; हा पहा मी चाललों. ( विट जातो. )

शका०--अरे माझा मित्र विट खरेंच गेला ? ( मैत्रेयाला पाहून ) अहो काकपदशीर्षमस्तकदुष्टबटुक हो, बसा, बसा, खालीं बसा.

मैत्रे०--आम्हांला बसविलेंच आहे.

शका०--कोणीं ?

मैत्रे०--आमच्या दुर्दैवानें.

शका०--बरें तर उठा, उठा आतां.

मैत्रे०--उठूं.

शका०--केव्हां ?

मैत्रे०--आमच्या डोकांडीचें दुर्दैव उठून जाईल तेव्हां.

शका०--बरें तर, रडा, रडा आतां.

मैत्रे०--रडविलेंच आहे आम्हांला.

शका०--कोणीं ?

मैत्रे०--दारिद्र्यानें.

शका०--बरें तर, हंसा, हंसा आतां.

मैत्रे०--हंसूं.

शका०--केव्हां ?

मैत्रे०—आमच्या चारुदत्ताला पुनः संपत्ति येईल तेव्हां.

शका०—अरे, दुष्ट भटुरग्या, भिकारड्या चारुदत्ताला माझा एक निरोप सांगशील का ? त्याला म्हणावें, जिच्यापाशीं पुष्कळ संपत्ति आहे, अशी जी कलावंतिणीची पोरगी वसंतसेना, ती कामदेवाच्या उत्सवापासून तुझ्यावर अनुरक्त झाली आहे. आम्ही बलात्कारानें तिला वश करीत असतां ती तुझ्या घरांत शिरली आहे. ती जर मुकाट्यानें माझ्या स्वाधीन करशील, तर चावडीवर गेल्याशिवाय माझा खटला तूंच संपविलास असें होऊन मी तुझ्यावर कृपा करीन; आणि तसें जर न करशील तर मरेपर्यंत तुझें आणि माझें वैर राहील, असें सांग. आणि तूंही खूप समज, मी राजशालक, संस्थानक आहें, माझ्यापुढें हळूं बोलत जा आणि मला ऐकूं येईल असें हळू बोलत जा, आणि मी आपल्या रंगमहालाच्या गच्चीवर बसलों असतां मला ऐकूं येईल असें हळूं बोलत जा. आणि असें जर न करशील तर कवाडाच्या संधींत सांपडलेल्या सुपारीप्रमाणें तुझें डोकेंच फोडीन !

मैत्रे०—सांगेन बरें तुमचा निरोप.

शका०—( चेटास ) माझा मित्र विट खराच गेला कायरे ?

चेट०—म्हइ, बसलाया जनु !

शका०—तर चल आपणही जाऊं.

चेट—मंग ही आपली तरवार सरकारांनींच घ्यावी.

शका०—नको नको, तुझ्यापाशींच असूं दे.

चेट—तस न्हव, आपल्यावानी शिरिमंताची तरवार मला गरिबाला कशापाई व्होवी ? जकडल्या तकड असल म्हंजी बर !

शका०—( उलटी घेऊन ) कायरे चेटा, आतां मी कसा ऐटींत शोभतों नाहीं ?

चेट—त्ये काय इचारावं म्हाराज !

## लावणी.

कंगनिदार जरतारी पिळाची पगडि शिरावर ॥
ऐटबाज पोशाख हातामंदि नंगी समशेर ॥



चेटः--॥ शिपाइबानिचा डौल मजेचा झोक नोकदार ॥
॥ बगुनू कामिना तुमा नगरच्या पडतिल बिमार ॥ (पृ. १९)

शिपाइबानिचा डौल मजेचा झोक नोकदार ॥
बगुन कामिना तुमा नगरच्या पडतिल बेमार ॥ १ ॥
( शकार आणि चेट जातात. )

मैत्रे०—गेली एकदाची पीडा. रदनिके, आतां यानें जी तुझ्याशीं दांडगाई केली ती चारुदत्ताला कळवायची नाहीं बरें. नाहीं तर तो आहे बिचारा आधीं दुःखानें पीडिलेला, त्याला हें ऐकून दुप्पट खेद मात्र होईल.

रद०—मी नांवाची रदनिका आहे. माझ्या तोंडांतून एक अक्षरही निघायाचें नाहीं. तुम्हीं मात्र संभाळा.

मैत्रे०—बरें तर. ( जातात. )

चारु०—( वसंतसेनेस रदनिका असें समजून ) रदनिके, हा रोहसेन इकडे उघडयावर निजला आहे. तो संध्याकाळच्या थंड वाऱ्यानें अगदीं कांकडून गेला आहे, तर ह्याला तेवढा माजघरांत नेऊन निजीव आणि हा शेला त्याच्या अंगावर घाल. ( शेला तिच्या अंगावर फेंकतो )

वसंत०—( शेला घेऊन ) हा मला आपली दासी समजला वाटतें ? असो. ( शेल्याचा वास घेऊन ) अगबाई—

पद. ( चाल—आले वनमाळी रात्रीं. )

दासि ऐसें मानुनियां कार्य मला सांगतसे ॥
सुदिन काय उगवला आज मनीं वाटतसे ॥ धृ० ॥
मधुर जातिसुमनांचा वास यास येत असे ॥
यौवनभर म्हणुनि याचा खास अजुनि पूर्ण असे ॥ १ ॥
[ शेला पांघरते ]

चारु०—रदानिके, रोहसेनाला माजघरात घेऊन जा असें मीं तुला सांगितलें तें ऐकलें नाहींस वाटतें ?

वसंत०—( मनांत ) आंत जावें इतकें कोठें आहे माझें भाग्य ?

चारु०—रदानिके, मी बोलतों त्याचें उत्तरसुद्धां देत नाहींस ना ? शिव शिव ! माझाच काळ फिरला, तुझ्याकडे काय दोष ?

साकी.

होतां भाग्य क्षीण नराचें, मित्रहि अमित्र होती ॥

चिरानुरतही जे जन, त्यातें जाणुनि अवमानीती ॥
देती तद्वचना ॥ प्रतिवच नच ते कष्ट मना ॥ १ ॥

( मैत्रेय व रदनिका येतात. )

मैत्रे०—मित्रा, ही तुझी रदनिका संभाळ कशी.

चारु०—काय ही रदनिका, तर मग ती कोण ? कोणी परस्त्री होतीं वाटतें ! शिव शिव ! मी न समजतां पांघरलेलें वस्त्र तिच्या अंगावर टाकिलें, त्यामुळें ती दूषित झाली असेल ?

वसंत०—दूषित नाहीं, पण भूषित मात्र झाली.

मैत्रे०—[पाहून] मित्रा, परस्त्रीची शंकाच नको येथें ! अरे कामदेवाच्या उत्सवापासून तुझ्यावर अनुरक्त झालेली वसंतसेना ही !

चारु०—काय वसंतसेना ही ! अरे अरे ! वसंतसेने, सेवकजनांला जे काम सांगायचें, तें न समजून मीं तुला सांगितलें हा माझ्याकडून मोटा अपराध झाला; एवढ्याकरितां मी आपलें मस्तक नम्र करून तुला प्रार्थना करतो कीं मला क्षमा कर.

वसंत०—छे छे ! आपल्या आज्ञेवांचून मी येथें आलें, म्हणून मीच अपराधी आहे, तेव्हां मीच आपली क्षमा मागतें.

[ एकमेकांच्या पाया पडूं लागतात. ]

मैत्रे०—अरे हें काय ? तुम्ही दोघेही सुखासुखी नम्र होऊन साळीच्या लोंबराप्रमाणें एकमेकांकडे डोकीं लववितां, हें आहे तरी काय ? मी सुद्धां आतां उंटाच्या ढोपराप्रमाणें आपलें डोकें लववून अशी प्रार्थना करितों कीं—

चारु०—पुरे पुरे. [ सर्व बसतात. ]

पद [ चाल—निजरूप इला मीं दावूं का ]

गतवैभव झालों ऐसा ॥ मी ॥ धृ० ॥ अशा समयिं ही भेटलि
मजला ॥ कुसुमचाप मनिं जागृत झाला ॥ परि तो माझ्या
मनिंच निमाला ॥ क्षुद्र नराचा कोप जसा ॥ १ ॥

मैत्रे०—मित्रा, राजशालकाचा तुला कांहीं निरोप आहे.

चारु०—तो कोणता ?

मैत्रे०—तो म्हणाला, धनकनकसंपन्न अशी जी कलावंतिणीची पोरगी



चारु०—अरे तिनें तुला कांहीं धर्म नाहीं केला, ठेव ठेविली आहे. ( पृ. २१ )

वसंतसेना ती कामदेवाच्या उत्सवापासून तुझ्यावर अनुरक्त झाली आहे. आम्ही बलात्कारानें तिला वश करीत असतां ती तुझ्या घरांत शिरली.

**वसंत**०--"बलात्कारानें तिला वश करीत असतां" असें जर तो खरेंच म्हणत असेल, तर मला हें एक भूषणच आहे.

**मैत्रे**०--ती जर मुकाट्यानें माझ्या स्वाधीन करशील तर सरकारांत गेल्याशिवाय माझा खटला तूंच संपविलास असें होऊन मी तुझ्यावर कृपा करीन; आणि तसें जर न करशील तर मरेपर्यंत तुझें आणि माझें वैर राहील.

**चारु**०--उं: ! तो काय मूर्ख आहे.--

## ठुंबरी.

**लाजवील ही सुरयुवतींसी ॥ तुलना नाहीं गुणरूपाशीं ॥ धृ० ॥**
**निर्धन मी हें समजुनि गेहीं ॥ जा म्हणतां ही गेली नाहीं ॥**
**बहुपुरुषांचा परिचय तरिही ॥ वदली नाहीं शब्द कसा मसि ॥१॥**

**वसंत**०--( **मनांत** ) किती तरी याची सभ्य रीति ही ! आणि भाषण तरी किती मधुर ! असो, अशाबरोबर आज येथें राहणें चांगलें नाहीं. ( उघड ) महाराज आपली मजवर पूर्ण कृपा असेल तर माझी एक विनंति आपण मान्य करावी. हे माझे दागिने संभाळावे, कारण यांच्यापायीं त्या दुष्टानीं माझी पाठ पुरविली आहे. म्हणून म्हणतें, हे आपण संभळावे.

**चारु**०--प्रस्तुत तुझे हे अलंकार ठेवून घेण्यासारखें माझें घर नाहीं.

**वसंत**०--हें आपण कांहीं तरी बोलतां. कोणी घर पाहून कांहीं ठेव ठेवीत नाहीं, मनुष्य पाहून ठेवतें.

**चारु**०--बरें, तुझा आग्रहच असेल तर ठेव. मैत्रेया, तेवढे अलंकार घे पाहूं.

**वसंत**०--[ **अलंकार देऊन** ] आतां मात्र माझ्यावर आपली पूर्ण कृपा झाली.

**मैत्रे**०--[ दागिने घेऊन ] वसंतसेने, तुझें कल्याण असो.

**चारु**०--अरे, तिनें तुला कांहीं धर्म नाहीं केला, ठेव ठेविली आहे.

**मैत्रे**०--तर मग चोर कां नेईनात--

**चारु**०--आणि थोडयाच दिवसांनीं--

**मैत्रे**०-- ही ठेव--

चारु०—ती परत घेऊन जाईल.

मैत्रे०—हं !

चारु०—मैत्रेया, हे दागिने दिवसां वर्धमानकानें संभाळावे आणि रात्रीं तूं संभाळावे, समजलास ? लोकाचे आहेत, ठेव आहे, नीट संभाळ.

वसंत०—आपली आज्ञा होईल तर मी मैत्रेयाला घेऊन घरीं जाईन म्हणतें.

चारु०—बरें आहे. मैत्रेय, जा, हिला पोंचवून ये.

मैत्रे०—नाहीं, नाहीं; मी नाहीं जाणार, आपणच जावें. या कलहंसगामिनीच्या मागें आपण गेलांत म्हणजे राजहंसाप्रमाणें शोभाल. मी आपला गरीब ब्राह्मण. मी जर इच्या मागून गेलों तर चव्हाटयावर टाकलेल्या भाकरीच्या तुकडयाला जशीं कुत्रीं लटगतात, तसे गांवचे टवाळ लोक मला फाडून खातील ! म्हणून म्हणतों कीं आपणच जावें.

चारु०—बरें तर मी जातों. राजमार्गीत मनुष्याची स्पष्ट ओळख पटण्यासारखी एक मशाल लावायला सांग ( आंत जातो. )

मैत्रे०—वर्धमानका, दिवटी पेटव पाहूं ?

वर्ध०—महाराज, घरांत एक तेलाचा थेंबही नाहीं आणि दिवटी कसली पेटवूं ?

मैत्रे०—( आपल्याशीं ) गणिका जशा स्नेहशून्य होऊन निर्धन पुरुषाचा अपमान करितात तशी आमची दिवटीसुद्धां स्नेहशून्य झाली !

*वसंतसेना—

पद. ( चाल—आज रहो मेरे प्यारे )

काय कळा ही सदना आली । धृ० ॥ सपरिवार ती लक्ष्मी जातां ॥ कुदशा भेसुरि आंत रिघाली ॥ १ ॥ मित्र परिजनीं पूर्ण असावें ॥ उदास दिसतें तें या कालीं ॥ २ ॥ जैसी तरुची पालवि गळतां ॥ उरे शुष्कता ती स्थिति झाली ॥ ३ ॥

चारु०—अरे दिवटी नको म्हणून सांग; कारण हा पहा—

---

* या ठिकाणीं वसंतसेनेनें हें पद्य म्हणावें. हें तिचें स्वगत आहे. चारुदत्त पोषाख करण्यासाठीं आंत जातो, तोंपर्यंतचा अवकाश भरून यावा म्हणून हें नवीन पद्य करून घातलें आहे.

पद. ( राग कानडा, त्रिताल. )

रजनिनाथ हा नभीं उगवला ॥ राजपथीं जणु दीपचि गमला ॥ धृ० ॥ नवयुवतीच्या निटिलासम किति ॥ विमल दिसे हा ग्रहगण भोंवति ॥ शुभ्रकिरण घन तिमिरीं पडती ॥ पंकीं जोंवि पयाच्या धारा ॥ १ ॥

( सर्व जातात. )

**अंक पहिला समाप्त.**

---

# अंक २ रा.

प्रवेश १ ला-( **द्यूतकार संवाहक धावऱ्याधावऱ्यां येतो.** )

**संवाहक**—आतां काय करावें ? हे दुष्ट द्यूतकार माझे प्राण घेतात कीं काय कोण जाणे ! आतां लपावें तरी कोठें ? महाराज, आपल्या घरांत तरी जागा द्या. ( **ऐकल्यासें करून** ) काय म्हणतां ? मी चोर आहे ? नाहीं नाहीं, गरीब मनुष्य आहे. नाहीं ऐकत ? आतां कोठें जावें ? ( **पडद्याकडे पाहून** ) अरेरे ! हा दुष्ट द्यूतकार आला ! आतां काय करावें ? छे ! आतां येथें थांबून उपयोग नाहीं. ( **धडपडत जातो.** )

प्रवेश २ रा–( चेटी प्रवेश करिते. )

**चेटी**—आईसाहेबांनीं मला कांहीं निरोप सांगायला पाठविलें आहे, पण ताईसाहेब रोजच्या जागेवर दिसत नाहींत. मग काय आज उठायला उशीर झाला कीं काय कोण जाणे. ( **पुढें पाहून** ) ह्या आल्याच वाटतें. तर आपण आतां बाजूला व्हावें.

[ **वसंतसेना आपल्याशीं कांहीं विचार करीत येते, व तिची दासी मदनिका मागून येते.** ]

**वसंत०**—

पद. ( चाल—उभि जवळ खरी ती. )

**त्या मदनमनोरमरूपीं, मन माझें गुंतुनि गेलें ॥**

कधिं वाहिन काया त्यासी, प्रेमें ही ऐसें झालें ॥
दिवस तो पूर्ण सौख्याचा, येईल मज कवण्या काळें ॥
॥ चाल ॥ गुणरूपाचिंतनीं पाही ॥ झोप मज नाहीं ॥
शयनिं मी निजलें ॥ किती तरंग हृदयीं उठले ॥ १ ॥

—बरें मदनिके, मग पुढें काय झालें ?

**मद०**—हें काय बाई ! पूर्वी कांहींच भाषण झालें नसून 'पुढें काय झालें' म्हणून विचारतां हें काय ?

**वसंत०**—अं, मीं काय म्हटलें गे ?

**मद०**—'पुढें काय झालें' म्हणून.

**वसंत०**—असें काय ?

(चेटी जवळ येते.)

**चेटी**—ताईसाहेब, आईसाहेबांनीं सांगितलें आहे कीं, लवकर अंग धुवून तेवढी देवांची पूजा करा.

**वसंत०**—अगे, आईला जाऊन सांग, कीं मी इतक्यांत अंग धूत नाहीं; ब्राह्मणाकडूनच पूजा करीव म्हणावें.

**चेटी**—आज्ञा ताईसाहेब. [ निघून जाते. ]

**मद०**—ताईसाहेब, मीं अगदीं स्नेहभावानें विचारतें हो, कुळ्या भावानें कांहीं नाहीं. खरेंच सांगा, तुम्ही मघाशीं जें बोललां त्याचा अर्थ काय ?

**वसंत०**—तुला कसें वाटतें ?

**मद०**—मला वाटतें कीं, तुमचें चित्त कालपासून जाग्यावर नाहीं; कोणी उत्तम पुरुष मनांत आणून त्याचें चिंतन करीत आहां असें दिसतें.

**वसंत०**—(हंसून) तरी म्हटलें तूं मदनिका ! दुसऱ्याचें मनोगत जाणण्यांत मोठी कुशल खरी.

**मद०**—ताईसाहेब, हें तुमचें करणें खरोखर मला आवडलें; कारण भगवान् कामदेव हा तरुणजनांचा मूर्तिमान आनंदच आहे. तर सांगा पाहूं तुमचें मन कोणावर गेलें आहे ? कोणा राजावर कां राजवल्लभावर ?

**वसंत०**—काय राजावर ? माझें नाहीं बाई मन त्यावर जायचें.

**मद०**—तें कां बरें ताईसाहेब ? ऐश्वर्यसुख भोगणारे राजे ते.

वसंत०—

पद. ( चाल—गुलचमनमे बीचू. )

भूपती खरे ते वैभवसुख सेवीती ॥ बहुदास सेवनीं दक्ष सदा राहाती ॥ अधिकारबळानें राज्यसूत्र चाळिती ॥ त्यां प्रजा सकळ सन्मान थोर तो देती ॥ चाल ॥ म्हणुनि कां त्यांसि सेवावें, सांग तूं ॥ धनाचि कां अधिक मानावें, सांग तूं ॥ गुण त्यांचे कां न वधावे, सांग तूं ॥ चाल ॥ संपत्ति-बळाच्या मदें धुंद ते होती ॥ स्वच्छंद वागती नाहिं तयां नयरीती ॥ १ ॥

—आणि त्यांच्याच माळेंतले ते राजवल्लभ !

मद०—राजा नाहीं, राजवल्लभ नाहीं; तर कोणी गुणवान्, रूपवान् तरुण वेदाभ्यासी असा ब्राह्मण कां ?

वसंत०—छे ग ! भलतेंच बोललीस, कारण—

पद. ( चाल—नंदगृहाच्या जवळ मुलींनो. )

वेदाभ्यासी ब्राह्मण सारे देवाचि भूवरिचे असती ॥ धृ० ॥
अमुच्या करीं जीं पापें घडती ॥ तेचि तयांचे निरसन करिती ॥
म्हणुनि सुभावें सादर चित्तीं ॥ धनदानें द्यावीं, तया तीं ॥ १ ॥

मद०—तर कोण, एकाद्या धनाढ्य व्यापाऱ्याचा मुलगा कां ?

वसंत०—छे, छे,—

पद. ( चाल कानडी )

योग्य न वणिज युवाही ॥ न्यून नसे जरि अंगीं कांहीं ॥धृ०॥
कांता प्रिय जी सुंदर तरुणी, लोटुनि तिस विरहानलिं गेहीं ॥
जाई सदा तो विपुल धनाच्या आशेनें परदेशा पाही ॥ १ ॥

मद०—तर मग माझा नाहीं बाई तर्क चालत. तुम्हीच सांगा.

वसंत०—अगे दुसरा कोण ?—

**पद. ( चाल—जो मम नयनचकोरा इंदू. )**

जो या नगरा भूषण खरा ॥ जैसा भाळीं शोभे हिरा ॥
ज्याच्या सद्गुणगानीं गिरा ॥ रंगली सुजनांची ॥ १ ॥
निर्धन असतां धनदापरी ॥ औदार्यातें अंगीं धरी ॥
दुर्दैवानें छळिलें तरी ॥ शील न सोडी जो ॥ २ ॥
करि जो दीनावरती दया । लोकीं वागे पाहुनि नया ॥
वाहिली ही मीं काया तया ॥ निर्मळ भावानें ॥ ३ ॥

**मद०**—पण कोण तो ? नांव कां सांगाना त्याचें ?

**वसंत०**—अगे मी कामदेवाच्या उत्सवासाठीं गेलें होतें. त्यावेळेस तूंच ना होतीस माझ्याबरोबर ?

**मद०**—होय मीच होतें, मग ?

**वसंत०**—मग मला काय नवखीसारखें विचारतेस ? तुला नाहीं का आठवण ?

**मद०**—हं हं ? समजलें. त्या दिवशीं तुम्हीं ज्याची प्रार्थना केलीत आणि ज्यानें तुम्हाला वचन दिलें तोच ना ?

**वसंत०**—होय तोच. पण त्याचें नांव सांग पाहूं ?

**मद०**—तो मोतीचौकांत राहतो तो.

**वसंत०**—अगे, मीं तुला त्याचें नांव विचारलें; ठिकाण नाहीं विचारलें.

**मद०**—अहो जो साऱ्या नगरींत प्रख्यात, त्याचें नांव कां मला ठाऊक नसेल ?

**वसंत०**—सांग तर.

**मद०**—श्रेष्ठ चारुदत्त, होय ना ?

**वसंत०**—( लाजून हर्षानें ) शाबास, बरोबर सांगितलेंस, तूं मोठी चतुर खरी.

**मद०**—( मनांत ) त्या पुरुषावर कां हिनें मन ठेविलें ! ( उघड ) पण ताईसाहेब—

**ठुंबरी. ( चाल—रुमक झुमक जोबना )**

कुसुमसमय संपतां तरुचा । मधुकरि करि कां आश्रय

त्याचा ॥ धृ० ॥ प्रियजन तुमचा निर्धन झाला ॥ काय असे
तो कामाचा ॥ १ ॥

**वसंत०**—

**पद.** ( चाल—युवराज शिवाजी सुखी. )

धनहीन असा होय सखे म्हणुनि त्यावरी ॥
जडलें मम मनास हे जाण झडकरी ॥ धृ० ॥
मजसम ज्या असति जगीं वारयोषिता ॥
त्यांनिं सधन पुरुष बघुनि त्यासि सेवितां ॥
लोभी हें दूषण जन देति तत्वतां ॥
होइल तें सहन कसें सांग अंतरीं ॥ १ ॥

**मद०**—इतकें जर तुमचें मन त्याच्यावर गेलें आहे, तर चटकन् उठून त्याच्याकडे तुम्ही जात कां नाहीं ?

**वसंत०**—अगे, कां जात नाहीं हें तुला काय सांगूं !—

**पद.** ( चाल—वस्त्रानें देह सारा. )

जरि सदना जाउनीयां त्याला मी भेटलें ॥
उपकृतिचें त्यासि आतां बळ नच गे राहिलें ॥
लज्जेनें दुःख त्याच्या जरि चित्ता वाटलें ॥
दुर्लभ तें समज बाई दर्शन कीं जाहलें ॥ १ ॥

**मद०**—अस्सें अस्सें ! म्हणूनच वाटतें त्याच्या घरीं अलंकार ठेवलेत.

**वसंत०**—मदनिके, बरें गे तुझ्या लक्ष्यांत आलें हें ? तूं तरी मोठी धोरणी खरी. ( धावऱ्याधावऱ्यां संवाहक येतो. )

**संवा०**—नायकिणी, तुला मी शरण आलों, माझें रक्षण कर.

**वसंत०**—शरणागताला अभय आहे; भिऊं नकोस. मदनिके, तेवढा दरवाजा लाव.

**संवा०**—[ मनांत ] सावकाराचें भय कसें असतें हें हिला ठाऊक आहे, ही एक फार चांगली गोष्ट झाली. जो आपली शक्ति पाहून ओझें घेतो, तो चालतांना कधींही अडखळत नाहीं.

( मदनिका दरवाजा लावून आल्यावर तिला वसंतसेना संवाहकाचा वृत्तांत विचार अशी खूण करिते. )

**मद०**—तुम्ही कोण, कोठले, कोणाचे; तुम्ही आपली उपजीविका कशानें करतां; तसेंच तुम्हांला भय कोणाचें आहे, हें कृपा करून सांगावें अशी आमच्या ताईसाहेबांची इच्छा आहे.

**संवा०**—ऐका, सर्व सांगतों. पाटलिपुत्र नगरांत माझें जन्म, माझ्या बापाचें नाव गृहपति. मी संवाहकाची वृत्ति करून पोट भरतों.

**वसंत०**—आपण ही फार नाजूक कला शिकलां आहां !

**संवा०**—अहो, पहिल्यानें ही सहज कला म्हणून शिकलों, परंतु आतां तीच कला माझ्या उपजीविकेला साधन होऊन बसली आहे.

**मद०**—आपण हें फार खेदाचें उत्तर दिलें. बरें पुढें ?

**संवा०**— मीं आपल्या घरीं असतां यात्रेकरू लोकांच्या तोंडून देशोदेशींच्या चमत्कारिक गोष्टी ऐकून देश पाहण्याच्या इच्छेनें घर सोडलें. या उज्जयिनी नगरांत येतांच मला एक यजमान मिळाला. त्याची शुश्रूषा मीं बरेच दिवस केली. तो पुरुष फार गुणी, देखणा तसाच, गोड बोलणारा तसाच; आपण केलेला उपकार कधींही उच्चारीत नाहीं आणि दुसऱ्यानें केलेला अपकार कधीं मनांत ठेवीत नाहीं. फार काय सांगावें, "हा माझा देह परोपकारार्थ झिजविण्याकरितां परमेश्वरानें दिला आहे," असें तो नेहमीं म्हणत असतो.

**मद०**—( **वसंतसेनेस** ) बाईसाहेब, तुमचा जो मूर्तिमंत मनोरथ, त्याचे गुण चोरून, उज्जयिनी नगराला शोभा देणारा असा हा दुसरा कोण असावा बरें ?

**वसंत०**—माझ्या मनांत हेंच आलें होतें; पण पुढें काय सांगतो पाहूं.

**मद०**—( **संवाहकास** ) बरें, मग पुढें काय झालें ?

**संवा०**—बाईसाहेब, पुढें काय सांगूं ? तो सत्पुरुष दुसऱ्यावर उपकार करण्याच्या कामीं आपल्या धनाचा व्यय करितां करितां—

**वसंत०**—काय निर्धन झाला म्हणतां ?

**संवा०**—हें मीं न सांगतां तुम्हीं कसें ताडलें हो ?

**वसंत०**--अहो यांत काय कठीण ! सद्गुण आणि वैभव हीं फार दिवस एके ठिकाणीं रहात नाहींत. नासक्या तळ्यांतच पाणी पुष्कळ असतें.

**मद०**—अहो, त्या पुरुषाचें नांव काय बरें ?

**संवा०**—अहो, जो या पृथ्वीवरचा केवळ मनुष्यरूपी चंद्रच, अशा त्या सत्पुरुषाचें नांव कोणाला माहीत नाहीं ? तो मोतीचौकांत राहणारा श्रेष्ठ चारुदत्त.

**वसंत०**--( **हर्ष पावून बैठकीवरून खालीं उतरते.** ) महाराज, हें आपलें घर आहे; मदनिके, जा, यांना बसावयाला गालिचा आणून घाल, आणि हातांत ताडाचा पंखा घेऊन यांना वारा घालीत उभी रहा. हे फार श्रमलेले दिसतात. ( **मदनिका तसें करिते.** )

**संवा०**--( **मनांत** ) कायहो आश्चर्य हें ! त्या श्रेष्ठ चारुदत्ताचें नांव घेतांच माझा केवढा सत्कार झाला ! शाबास चारुदत्ता, धन्य आहे तुझी ! पृथ्वीच्या पाठीवर जिवंत असा तूंच; बाकीचे सर्व श्वास मात्र सोडणारे आहेत ! असो, नायकिणी, तूंही बैस.

**वसंत०**--( बसून ) हे श्रेष्ठा, तुमचा धनी कोठें आहे, आणि त्याच्या जवळ धन कोणतें आहे ?

**संवा०**--आतां त्यांच्यापाशीं द्रव्य म्हणाल तर सत्कारावांचून कांहीं नाहीं.

**वसंत०**--बरें, पुढें तुमची हकीगत सांगा पाहूं.

**संवा०**--पुढें काय ! तो निर्धन झाला, तेव्हां त्याला मीं सोडलें आणि द्यूतकर्मांत शिरलों. परंतु त्यांतही माझें नशीब फिरलें, आणि द्यूतांत मी दहा मोहरा हरलों. त्या मोहरा द्यायला मजपाशीं नाहींत म्हणून द्यूतकार मंडळींनें फार हाल केले, तेव्हां पळत पळत तुमच्या घरांत शिरलों.

**वसंत०**--पाहिलेंस मदनिके ! वृक्ष फलपत्रांनीं रहित झाला म्हणजे त्यावर राहणारे पक्षी चहूंकडे उडून जातात, तशी त्यांची अवस्था झाली आहे. तें असो; तूं आतां हें कंकण घेऊन त्या द्यूतकाराकडे जा आणि सांग कीं, हें कंकण संवाहकानें दिलें आहे, तर हें घेऊन पुन्हां त्याला त्रास देऊं नये. ( **संवाहकास** ) श्रेष्ठा, आतां खुशाल आपल्या मनुष्यांना भेटायला जा.

**संवा०**—आर्ये, ज्याअर्थी तूं माझ्यावर एवढा उपकार केलास, त्याअर्थी प्रत्युपकार म्हणन जी कला माझ्यापाशीं आहे ती तुझ्या दासीजनाला शिकवितों.

**वसंत०**—आर्या, ज्याच्याकरितां ही कला शिकावयाची त्याची शुश्रूषा आपण केलीच आहे; तशीच पुढें करावी म्हणजे झालें.

**संवा०**—( **मनांत** ) हिनें तर आपल्याला झिडकारलें, आतां प्रत्युपकार कसा करावा ? ( उघड ) आर्ये, माझा तूं अपमान केलास, तर आतां मी जती होतों.

**वसंत०**—आर्या, असें साहस करूं नये.

**संवा०**—जो निश्चय झाला तो कांहीं ढळावयाचा नाहीं. ( **इकडे तिकडे फिरून** ) इतके दिवस द्यूतकार होतों म्हणून रस्त्यांतून हिंडायची लाज वाटत असे. आता भर राजमार्गांतून उघडया बोडक्यानें सुद्धां हिंडायची भीति नाहीं. नमो बुद्धाय. ( **पडद्यांत गलबला होतो.** )

**संवा०**—( ऐकून ) काय म्हणता ? वसंतसेनेचा स्तंभभंजक नांवाचा हत्ती मत्त होऊन सुटला आहे ! तर मग तो जाऊन पहावा तरी—अथवा हत्ती पाहून आपल्याला काय करायचें आहे ? आपला जो निश्चय झाला तो ढळायचा नाहीं. ( जातो. )

[ शिपायाचा वेष घेतलेला हर्षयुक्त कर्णपूरक येतो ]

**कर्णपूरक०**—कोठें, कोठें आहे आर्या वसंतसेना ?

**मद०**—अरे ए दांडग्या, तूं इतका बावरलास का ? ताईसाहेब तुझ्या समोर असून पहात नाहींस आणि कोठें आहे, कोठें आहे म्हणतोस, हें काय ?

**कर्ण०**—[ **वसंतसेनेला पाहून** ] आर्ये, तुला प्रणाम करितों.

**वसंत०**—कर्णपूरका, तुझ्या मुखश्रीवरून तूं फार संतोषांत आहेस असें दिसतें.

**कर्ण०**—आर्ये, तूं या कर्णपूरकाचा पराक्रम नाहीं पाहिलास. घालविली संधी.

**वसंत०**—अरे असा पराक्रम तरी कोणता केलास ?

**कर्ण०**—आज असें झालें. तुझा खेळावयाचा जो स्तंभभंजक नांवाचा

दुष्ट हत्ती तो मत्त होऊन, साखळदंड तोडून, महाताला मारून, राजमार्गात आला; तेव्हां अरे धांवा, पळा, पोरें उचला, घरावर चढा, झाडावर चढा, नाहीं तर प्राणास मुकाल, अशी चोहोंकडे एकच ओरड झाली. त्या दुष्ट हत्तीनें पायांतील पैंजण, तोरड्या, गळ्यांतल्या रत्नांच्या माळा तोडून फेंकून दिल्या; आणि दांत, पाय, सोंड यांनीं, प्रफुल्लित अशा उज्जयिनी नगरीचा विध्वंस मांडला, व राजमार्गांतून जाणारा एक जती गांठला. त्याचा दंड-कमंडलू फोडून तोंडांतल्या थुंकीनें त्याला भिजवून टाकिलें, आणि दातांनीं त्याला उचलून घेतलें. हें पाहतांच " अरेरे जती मेला, जती मेला, " अशी चोहोंकडे एकच ओरड झाली.

**वसंत०**—[ घाबरून ] अगबाई! मग ?

**कर्ण०**—आर्ये, घाबरूं नकोस. पुढचा वृत्तांत तर ऐक. तो मत्त-गज, एका दांतावर तुटका साखळदंड व एका दांतावर तो जती घेऊन चालला, असें पाहून या कर्णपूरकरानें,—छे, छे, आर्येच्या अन्नानें पुष्ट झालेल्या दासानें—लोहाराच्या दुकानांतून एक पहार घेतली आणि त्या दुष्ट गजाला हांक मारली.

**वसंत०**—मग पुढें ?

**कर्ण०**—मग विंध्य पर्वताच्या अति उच्च शिखरासारख्या त्या गजाला पहारेचा प्रहर करून त्याच्या दांतांच्या संधींत सांपडलेला तो जती सोडविला.

**वसंत०**—शाबास ! कर्णपूरका, खरा पराक्रम केलास !

**कर्ण०**—त्या वेळेस शाबास ! कर्णपूरका शाबास ! असें म्हणत सारी उज्जयिनी नगरी माझ्या भोंवतीं मिळाली. तेव्हां जशीं नावेंत गच्च मनुष्यें भरावीं, तशी माणसांची तेथें एकच गर्दी झाली. त्या दाटींत एक पुरुष होता. त्यानें कर्ण, कंठ, मनगट, इत्यादि जीं भूषणांची स्थानें तीं चांचपून, तेथें कांहीं नाहीं असें पाहून आकाशाकडे दृष्टि लावून दीर्घ श्वास सोडला व अंगावरला शेला काढून माझ्या अंगावर फेंकिला; तो हा पहा.

**वसंत०**—कर्णपूरका, त्या शेल्याला जाईच्या फुलांचा वास येतो आहे कां पहा.

**कर्ण०**—आर्ये, माझ्या नाकांत हत्तीच्या मदाचा गंध शिरला आहे, यामुळें मला वास येत नाहीं.

**वसंत०**—बरें, त्यावर कोणाचें नांव आहे कां पहा.

**कर्ण०**—यावर नांव आहे, पण मला वाचतां येत नाहीं.

**वसंत०**—आण इकडे पाहूं. [ **शेला घेऊन व वरचें नांव वाचून** ] अगबाई, यावर चारुदत्ताचें नांव आहे. [ **शेला पांघरते.** ]

**मद०**—कर्णपूरका, हा शेला ताईसाहेबांच्या अंगावर चांगला शोभतो, नाहीं?

**कर्ण०**—चांगला शोभतो, पण कोणाचा हा?

**वसंत०**—कोणाचा! कर्णपूरका, या शेल्याबद्दल मी तुला दुसरें कांहीं देतें [ **कंकण देते.** ]

**कर्ण०**—[ **कंकण घेऊन मुजरा करतो.** ]

**मद०**—[ **त्याच्या कानांत** ] हा शेला श्रेष्ठ चारुदत्ताचा. समजलास!

**कर्ण०**—[ **मदनिकेला** ] आतां मात्र हा शेला ताईसाहेबांच्या अंगावर चांगलाच शोभतो!

**वसंत०**—कर्णपूरका, हल्लीं तो पुरुष कोठें आहे बरें?

**कर्ण०**—या, याच रस्त्यांने गेला.

**वसंत०**—मदनिके—

**पद.**

माडिवरी चल गडे जाउं झडकरी ॥
पाहुं सदय दानशूर मूर्ति ती बरी ॥ धृ० ॥
मी अधीर दर्शनासि फार अंतरी ॥
होइल सुख मजासि तया पाहिल्यावरी ॥ १ ॥

[ जातात. ]

## अंक दुसरा समाप्त.



**वसंत०**—मी अधीर दर्शनासि फार अंतरीं ॥ होइल सुख मजसि तया पाहिल्यांवरी ॥ १ ॥ (पृ. २२)

# अंक ३ रा.

[ मैत्रेय निजलेला असून जवळ समई जळत आहे; इतक्यांत शर्विलक नांवाचा चोर, हातांत पहार, सुरी, कीटक इत्यादि साहित्य घेऊन प्रवेश करितो. ]

**शर्वि०**—चोरगुरु जो भगवान् कार्तिकेय त्याच्या वचनाप्रमाणें या पक्क्या विटांच्या भिंतीला पूर्णकुंभ नांवाचें छिद्र पाडून आंत तर आलों. [ पाहून ] अरे ! येथें कोणी निजलें आहे. काय, मृदंग, पखवाज, वीणा, सतार इत्यादि नुसतीं वाद्येंच दिसताहेत! तर मग हा नाटकीरे नाटकी ! बडा घर आणि पोकळ वासा ! येथें कांहीं लभ्यांश दिसत नाहीं. असो, आतां जावें.

**मैत्रे०**—[ झोपेंत बरळतो. ] अरे मित्रा, भिंतीला भोंक पाडल्यासारखें दिसतें. चोर आला आहे वाटतें. तर हे दागिने तूं आपल्याजवळ घे.

**शर्वि०**—अरे हा जागा आहे काय ? मारूं याला ठार ? पण नको. बरें पण हें ह्या फाटक्या पंचांत कांहीं झळकतें आहे. हे बहुतकरून सोन्याचे दागिने असावे. घेऊं का हे ?

**मैत्रे०**—अरे मित्रा, तुला गाईब्राह्मणांची शपथ आहे. हे घे लौकर.

**शर्वि**—( मनांत ) गाईब्राह्मणांची शपथ कोणीं मोडूं नये. [ घेऊं लागतो. ] अरे पण हा येथें दिवा जळत आहे. [ स्मरल्यासारखें करून ] अरे हो. मजजवळ हा अग्निकीटक आहे, याला सोडून देतों. [ तसें करितो ] या; यानें दिवा तर मालविला. [ गांठोडी घ्यावयास पुढें हात करितो. ]

**मैत्रे०**—मित्रा, तुझ्या हातांचीं बोटें गार कां लागतात !

**शर्वि०**—( चपापून ) कवाडावर पाणी शिंपल्यामुळें माझीं बोटें गार झालीं आहेत. असो; काखेंत घालून ऊब आणतों. ( तसें करून गांठोडी घेतो. )

**मैत्रे०**—घेतलीस ना !

**शर्वि०**—( हळूंच ) ब्राह्मणाची प्रार्थना कशी मोडावी, म्हणून घेतली बरें.

मैत्रे०---आतां मी निश्चिंत झालों. आतां सुखानें निद्रा येईल.

शर्वि०---महाब्राह्मणा, आतां शंभर वर्षे निजून रहा ! ( जातो. )

( घाबऱ्याघाबऱ्या रदनिका प्रवेश करिते )

रद०—वर्धमानका, अरे वर्धमानका, मैत्रेया, अहो मैत्रेयभटजी, उठा, धांवा लवकर, हा पहा घरांत चोर शिरला होता तो भिंतीला भोक पाडून पळून चालला आहे. धांवा, धांवा लवकर !

मैत्रे०—अं, काय म्हणतेस ? चोर ? आमच्या घरांत चोर यायला तो खुळाच असेल !

रद०—आतां काय करावें ? हा पहा पळून गेला.

मैत्रे०—( उठून पाहून ) खरें गे खरें. अबबब ! बटकीचे पोरी, केवढें भोंक हें ! दुसरें दारच उघडलें आहे कीं काय असें वाटतें ! अरे मित्रा चारुदत्ता, निजलास काय, ऊठ. आपल्या घरांत चोर शिरला होता, तो भिंतीला भोंक पाडून पळून गेला.

चारु०—बरें, जाऊं दे गेला तर; थट्टा करतोस वाटतें माझी ?

मैत्रे०---अरे थट्टा नव्हे, हें पहा प्रत्यक्ष.

चारु०---कोणत्या ठिकाणीं रे भोक पाडिलें आहे ?

मैत्रे०---हें पहा आपल्या उशागतच्या भिंतीला.

चारु०—( पाहून ) वाहवा ! हा भोकसा तरी किती डौलदार पाडला आहे ! अशा कर्मांत सुद्धां इतकी कुशलता असते ! मोठेंच आश्चर्य हें !

मैत्रे०—मित्रा, मला असें वाटतें कीं हा भोंसका कोणीं तरी परगांवच्या चोरानें पाडला असावा, अथवा नव्या चोरानें तरी पाडला असावा; कारण आमच्या घरांत वैभव किती आहे, हें या उज्जयिनी नगरांतल्या प्रत्येकाला माहीत आहे.

चारु०—तूं म्हणतोस तें खरें; हा कोणीतरी नवशिक्या असावा. परंतु मित्रा—

## साकी.

धनलोभानें शिरला पाहुनि भव्यसदन थोराचें ॥
परि फसला तो दैवचि खोटें घाटे त्या चोराचें ॥
माझी अपकीर्ती ॥ लोकीं होइल आतां ती ॥ १ ॥

मैत्रे०—अरे त्या दुष्ट चोराकरितां देखील इतका हळहळतोस ना ? ह्यानें तर मनांत आणिलें असेल कीं, हें थोरामोठ्याचें घर आहे, यांत शिरून सोन्याचे जडावाचे दागिने चोरून न्यावे—( चपापून ) अरे माझ्यापाशीं वसंतसेनेचे दागिने होते ते कोठें आहेत ? ( स्मरण करून ) कां मित्रा, तूं जेव्हां तेव्हां म्हणत असतोस ना, कीं मैत्रेय अज्ञान, मैत्रेय अजागळ, पण या वेळेस कशी केली ! ती दागिन्यांची गांठोडी तुझ्या स्वाधीन केली म्हणून बरें झालें, नाहींतर त्या रांडलेकानें नेली असती ना !

चारु०—मित्रा, पुरे आतां थट्टा; नीट ठेवली आहेस ना ?

मैत्रे०—तूं मला मूर्खच ठरविलें आहेस; तेव्हां थट्टा कोठें करावी आणि कशी करावी हें मला काय माहीत ?

चारु०—मित्रा, खरेंच कां माझ्या स्वाधीन केलीस ?

मैत्रे०—नाहीं नाहीं, खोटें सांगतों ?

चारु०—केव्हां बरें माझ्या स्वाधीन केलीस ?

मैत्रे०—मीं जेव्हां तुला म्हटलें, तुझ्या हाताचीं बोटें गार कां लागतात, तेव्हां.

चारु०—असेल कदाचित्, तसेंही झालें असेल. ( इकडे तिकडे चांचपून व दागिने नाहींत असें पाहून ) मित्रा, तुला एक मोठी आनंदाची गोष्ट सांगतों.

मैत्रे०—काय आहेत ना दागिने ?

चारु०—अरे दागिने तर चोरानें नेलेच—

मैत्रे०—मग आनंदाची गोष्ट ती कोणती ?

चारु०—हीच, कीं तो चोर आमच्या घरांतून कृतार्थ होऊन गेला.

मैत्रे०—अरे पण ती दुसऱ्याची ठेव होतीना !

चारु०—अरे-- हो-- ती दुसऱ्याची ठेव नव्हे काय ? हर हर !

मैत्रे०—मित्रा, तूं घाबरूं नकोस. अरे ती दुसऱ्याची ठेव तिसऱ्या चोरानें नेली, त्याला आम्हीं काय करावें ?

चारु०—छे छे ! असें कसें होईल ? कारण--

### पद ( चाल—राग तोडी—त्रिताल. )

जन सारे मजला म्हणातिल कीं ।। धृ० ।।
दारिद्र्यानें बहुतचि छळिलें ।।
धन त्याजवळीं कांहीं न उरलें ।।
म्हणुनि कर्म हें अनुचित केलें ।।
ऐसें दूषण देतिल कीं ।। १ ।।

मैत्रे०--असें म्हणतील तर लोक बेटे मूर्ख आहेत. आतां मी सांगतों असें कर. वसंतसेना दागिने मागायाला आली, म्हणजे तिला बेलाशक सांग कीं तूं मजजवळ दागिने ठेवले नाहींस, मी ठेवून घेतलें नाहींत, दिले कोणीं, घेतले कोणीं, साक्ष कोण, आहे काय, समजलास कां ?

चारु०--शिव शिव ! काय सांगतोस हें ?

### साकी.

भिक्षा मागुनि दारोदारीं फेडिन ऋण गणिकेचें ।।
परि कीर्तिला कलंक येई ऐसें भाषण वाचें ।।
नच हा उच्चारी ।। भलता आग्रह तूं न करी ।। १ ।।

रद०—[ प्रवेश करून ] मैत्रेया, तुम्हांला धूताबाईनीं बोलाविलें आहे. चला लवकर. [ मैत्रेय जातो ]

चारु०—[ " जन सारे मजला " इ० पूर्वोक्त म्हणतो व कांहीं वेळ थांबून ) मैत्रेयाला यायला उशीर कां लागला बरें ? हें चोरीचें वर्तमान धूतेला कळून तिनें कांहीं भलतेंसलतें केलें नसेलना ? [ हांक मारतों ]

मैत्रे०—[ गडबडीनें ] आलों, आलों. ही घे बरें. ( रत्नमाला देतो ).

चारु०--मित्रा, हें काय ?

मैत्रे०--तूं आपल्या स्वभावाला अनुरूप अशी स्त्री केलीस त्याचें फळ हें !

चारु०—[ माला घेऊन दु:खानें ] मित्रा, माझ्या स्त्रीनें मला साह्य करावें, असा प्रसंग यावा ना !



मैत्रेयः—तूं आपल्या स्वभावाला अनुरूप स्त्री केलीस त्याचें फळ हें (पृ. ३६)

पद. [ बेहाग. चाल—कवणें तुज गांजियलें. ]

शिव शिव शिव निर्धनता आज ये खरी ।।
स्त्रीसम मी होय खचित नाहिं धन करीं ।। धृ० ।।

—अथवा मी निर्धन नव्हे हेंच खरें; कारण—

भार्या कुलशीलवती साध्वी ती असे ।।
तूज ऐसा मित्र सदा सदनिं मम वसे ।।
असतें हें सौख्य काय निर्धना घरीं ।। १ ।।

तर मित्रा, माझ्या स्त्रीनें दिलेली ही रत्नमाला घेऊन असाच वसंतसेनेकडे जा, आणि तिला माझा निरोप सांग कीं, तूं जे सुवर्णालंकार माझ्यापाशीं दिले होतेस, ते माझेच असें समजून मीं द्यूतांत हरविले; म्हणून त्यांच्या मोबदला ही रत्नमाला तुझ्याकडे पाठविली आहे. तर कृपा करून हिचा स्वीकार कर.

मैत्रे०—मित्रा, हें काय भलतेंच करतोस ? अरे, तिचे अलंकार ते किती मोलाचे आणि ही रत्नमाला कोणीकडे ! शिवाय त्या दागिन्यांचा तूं उपभोग घेतला नाहींस, कांहीं नाहीं. त्याकरितां पृथ्वीच्या मोलाची रत्नमाला देतोस हें काय ?

चारु०—छेः असें म्हणूं नकोस; तिच्या अलंकारांकरिता मी ही रत्नमाला तिला देतों असें नाहीं. तर तिनें जो माझ्यावर विश्वास ठेविला त्याची किंमत म्हणून देतों. तर एवढी घेऊन जा आणि तिच्याकडून ही घेवविल्याशिवाय आलास तर माझ्या गळ्याची शपथ आहे. तोंपर्यंत लोक दोष ठेवतील म्हणून वर्धमानकाकडून हें भोंक बुजवितों.

मैत्रे०—शपथच घातलीस म्हणून जातों. पण—

चारु०—पण बिण नको, जाच; आणि तिच्याजवळ भाषण करितांना आपलें दैन्य मात्र दाखवूं नकोस.

मैत्रे०—बोलण्यांत नाहीं दाखवीत. माझा मित्र चारुदत्त किती दरिद्री आहे, हें प्रत्यक्षच दाखवितों.

चारु०—भलतेंच,—

## साकी.

भार्या वश मज मिळे मित्र सुखदुःखीं सम तुज ऐसा ॥
सत्याचा कधिं घडला नाहीं भंग मम करीं तैसा ॥
कैसा निर्धन मी ॥ मानितसें हें त्रय लक्ष्मी ॥ १ ॥

[ सर्व जातात. ]

## प्रवेश २ रा.

( चेटी प्रवेश करिते )

**चेटी**—आईसाहेबांनीं मला ताईसाहेबांकडे कांहीं निरोप सांगायला पाठविलें आहे; तर तिकडेच जावें. ( पाहून ) ह्या पहा ताईसाहेब! हातांत चित्राची फळी घेऊन मदनिकेसह इकडेच येताहेत.

**वसंत०**—मदनिके, ही चारुदत्ताची तसबीर अगदीं हुबेहूब काढिली आहे, नाहीं बरें ?

**मद०**—खरेंच ताईसाहेब, अगदीं हुबेहूब काढिली आहे.

**वसंत०**—हें तूं कशावरून म्हणतेस ?

**मद०**—आपली स्नेहयुक्त दृष्टि या तसबिरीकडे लागली आहे म्हणून.

**वसंत०**—हें तूं वेश्याजनांच्या चालीप्रमाणें तोंडापुरतें बोलतेस वाटतें !

**मद०**—सर्वच वेश्या तसें बोलतात कीं काय ?

**वसंत०**—अगे हो, अनेक प्रकारच्या पुरुषांशीं प्रसंग पडतो म्हणून त्यांना तोंडापुरतें बोलणें भाग पडतें.

**मद०**—पण मी तर, ताईसाहेब, तुमची दृष्टि आणि मन हीं दोन्हीं या तसबिरीवर जडलीं म्हणूनच तसें म्हटलें.

(चेटी पुढें होते.)

**चेटी**—ताईसाहेब, आईसाहेबांनीं सांगितलें आहे कीं, मागल्या दारीं बुरख्याची गाडी आली आहे; तिच्यांत बसून आपण जावें.

**वसंत०**—श्रेष्ठ चारुदत्ताकडून कां आली आहे ?

**चेटी**—नाहीं. ज्यानें गाडीबरोबर दहा हजार मोहरांचा दागिना पाठविला आहे त्याच्याकडून.

वसंत०—तो कोण !

चेटी—तो राजशालक संस्थानक.

वसंत०—( रागानें ) चल निघ येथून अगोदर! पुन्हा ही गोष्ट माझ्या-पाशीं काढशील तर खबरदार.

चेटी—ताईसाहेब, क्षमा करा. मी काय करूं? आज्ञेप्रमाणें निरोप कळविला. बरें तर आईसाहेबांना काय जाऊन सांगूं?

वसंत०—आईला जाऊन सांग कीं, मीं जिवंत रहावें असें जर तुझ्या मनांत असेल तर पुन्हां असला निरोप पाठवूं नको.

चेटी—आज्ञेप्रमाणें जाऊन कळवितें.

वसंत०—अगे थांब, मीच सांगतें. मदनिके, तसबीर पलंगावर नेऊन ठेव आणि येतांना ताडाचा पंखा घेऊन ये. मी आईकडे जातें.

( सर्व जातात; शर्विलक प्रवेश करितो. )

शर्वि०—या शर्विलकानें काल रात्रीं—

पद. [ चाल—प्रतिकूल होइल कैसा. ]

लाज येइ रजनिस ऐसें घोर कर्म केलें ॥ राजदूत सावध
असतां त्यांसि वंचियेलें ॥ धृ० ॥ मोह घालि निद्रा जरि ती
तीस जिंकियेलें ॥ चौर्यनिपुण ऐसा मी परि अरुणकांति
जालें ॥ पहा कसें मुख हें माझें तेजशून्य झालें ॥ तेज जसें
या चंद्राचें सर्व लया गेलें ॥ १ ॥

—चौर्यकर्म करणें तरी किती भीतीचें आहे !—

साकी.

कोणी चालत येतां वाटें शोधाया मज आला ॥
धांवत येतां आला वाटें बद्ध कराया मजला ॥
दूषित मन ज्याचें ॥ येतो संशय मनि त्याचे ॥ १ ॥

—ही मदनिकाच आली वाटते. वाहवा—

पद. [ चाल—निजरूप इला मीं दावूं का. ]

मज लावण्याची खनि दिसते ॥ धृ० ॥ केवळ रतिची मूर्ति
विराजे ॥ चंदनलेपासम ही साजे ॥ कामाकुल या देहातें ॥ १ ॥

मदनिके ये. मी तुझ्याच भेटीची वाट पहात आहें.

मद०—[ प्रवेश करून ] अगबाई ! हा शार्विलक येथें कोठून आला बरें ? शार्विलका, ये; कोणीकडून आलास ?

शार्वि०—सर्व सांगतों, पण—

वसंत०—[ बाहेर येऊन आपल्याशीं ] कोणाशीं बोलत आहे बरें ही मदनिका ? हं समजलें. हिला दासीपणांतून सोडवून नेणारा तोच हा असावा. बोलूं दे दोघांना, आपण कशाला त्यांच्या मुखाआड या ?

मद०—शार्विलका, पण तूं आलास कोठून ?

शार्वि०—[ शंकित होऊन मागें पुढें पाहतो. ]

मद०—अरे, तूं असा कावराबावरा कां दिसतोस ?

शार्वि०—तुला कांहीं गुह्य गोष्ट सांगावयाची आहे, पण यथ कोणी ऐकत नाहींना !

मद०—कोणी नाहीं येथें. सांग पाहूं. भिऊं नको.

वसंत०—( मनांत ) काय ? गुह्य गोष्ट आहे म्हणतो ? तर आपण ऐकूं नये.

शार्वि०—कायगे मदनिके, कांहीं द्रव्य घेऊन तुला वसंतसेना सोडील का ?

वसंत०—( मनांत ) काय, माझ्या संबंधाच्या गोष्टी आहेत ? तर मग आड उभें राहून ऐकूं या.

मद०—शार्विलका, ही गोष्ट मीं एकवेळ ताईसाहेबांना विचारली होती. त्यावेळेस त्या म्हणाल्या, मीं जर स्वतंत्र असतें, तर द्रव्य घेतल्यावांचून सर्व दासीजनांला सोडलें असतें, पण काय करूं ? धनीपणा पडला आईकडे, तेथें माझें कांहीं चालत नाहीं. बरें पण शार्विलका, मला सोडवून नेण्यापुरतें तुझ्या-जवळ द्रव्य कोठें आहे अगोदर ?

शार्वि०—त्या संबंधानें मीं कांहीं. तजवीज केली आहे, तं तुला सांगतो—

### साकी.

दारिद्र्यानें जरि पीडित मी तव रूपीं हें जडलें ॥
मानस माझें यास्तव रात्रीं कांहीं साहस केलें ॥
लाभ तुझा व्हाया ॥ हा तव दासपणा जाया ॥ १ ॥

**वसंत०**–( मनांत ) याची मुद्रा प्रसन्न असून साहसकर्मानें घाबरल्यासारखी दिसते.

**मद०**–शर्विलका, स्त्रियांच्या नादीं लागून तूं साहस करतोस, पण यांत तुझ्या शरीराची व अब्रूची हानि होईल, समजलास ?

**शर्वि०**–वेडी आहेस तूं, मित्री कोठली ! अगे, असें साहस केल्यावांचून का कोठें संपत्ति मिळते ?

**मद०**–अरे, पण माझ्याकरितां साहस करतांना तूं कांहीं भलतेंच तर केलें नाहींस ना ?

**शर्वि०**–तशी शंका सुद्धां घेऊं नकोस. हें पहा—

**पद.** ( चाल—उद्यां बघ जाते. )

फुलें वेलिचीं ॥ भूषणें तशीं युवतींचीं ॥ धृ० ॥
नाहीं कधिं मीं गे चोरिलीं ॥ द्विजयज्ञधनें नच मीं हरिलीं ॥
बाळें वित्तार्थ न कधीं नेली ॥ रीति चौर्याची ॥ धरिली ही
सुविचाराची ॥ १ ॥

–तर मदनिके, वसंतसेनेला अशी विनंति कर कीं, आपल्या अंगाच्या बेताचे हे दागिने मुद्दाम घडवून आणले आहेत, तर एवढे गुप्तपणें अंगावर घालावे.

**मद०**—उघड रीतीनें अंगावर घालतां येत नाहींत, असे दागिनेच आमच्या ताईसाहेब कधीं घालीत नाहींत. पण कसे आहेत ते दाखीव तर अगोदर.

**शर्वि०**—हे पहा [ **शंकितपणानें ते तिला देतो.** ]

**मद०**—[ **पाहून** ]अगबाई ! हे दागिने ओळखीचे दिसतात. शर्विलका, कोठून रे आणलेस हे ?

**शर्वि०**—तुला कां त्याची पंचाईत ? घे म्हणजे झालें मुकाट्यानें.

**मद०**—अरे, पण सांगेनास का कोठून आणलेस ते ?

शर्वि०—मुकाट्यानें घे म्हणतोना ? कोठून आणले, कसे आणले, तुला काय त्याचें ?

मद०—इतका जर तुझा माझ्यावर विश्वास नाहीं, तर मला द्रव्य देऊन सोडवून तरी कशाला नेतोस ? ( दागिने टाकून जाऊं लागते. )

शर्वि०—बरें रागावूं नको; सर्व सांगतों. हे दागिने मोतचौकांत जो चारुदत्त म्हणून सावकारपुत्र रहातो, त्याच्या घरचे; आणि हें देखील मला आज सकाळीं समजलें.

( मदनिका व वसंतसेना घाबरतात. )

शर्वि०–मदनिके, चारुदत्ताचें नांव घेतांच तूं अशी घाबरलीस कां ?

मद०—अरे साहसिका, निर्दया, हें साहस करतांना त्या घरांत तूं कोणाचा प्राण तर घेतला नाहींसना ? किंवा कोणावर घाव तर घातला नाहींसना ?

शर्वि० — हा शर्विलक भ्यालेल्यावर किंवा निजलेल्यावर घाव घालणार नाहीं; समजलीस ? कोणाचा प्राणही घेतला नाहीं, आणि कोणावर घावही घातला नाहीं, उगीच कां भितेस ?

मद०—खरेंच ना पण हें ?

शर्वि० —तुझ्या गळ्याची शपथ.

मद० — बरें झालें बाई ! आतां माझ्या जिवांत जिव आला !

शर्वि० —( असूयेनें ) कायग मदनिके, 'बरें झालें' असें जें तूं म्हटलेंस तें काय म्हणून ? समजलों; त्या चारुदत्ताच्या जिवाला कांहीं अपाय झाला नाहीं असें जेव्हां समजलें, तेव्हां तुला बरें वाटलें वाटतें ? हा दुष्टे—

पद.

ह्मावा लाभ तुझा मजला ॥ यास्तव निंद्य मार्ग धरिला ॥
त्वदर्थाचि डागहि लावियला ॥ निर्मलशा कुलकीर्तीला ॥
बहुसन्मानानें नेत असुनि तुज येथुनि सदनाला ॥
प्रेम दाखवुनि मजवरि लटिकें वांछिसि अन्याला ॥ १ ॥

—खऱ्या शहाण्यानें या स्त्रियांच्या नादीं कधीं लागूं नये.

## साकी.

काम अग्निसम सुरतज्वाला प्रेम होय इंधन तें ॥
नरयौवनधन या दोहोंची त्यांत आहुती पडते ॥
यास्तव सुविचारें ॥ असावें सावध हेंचि बरें ॥ १ ॥

मद०—अरे, पण एकदम इतका संतापलास कां? मीं काय केलें! [ जवळ जाते. ]

शर्वि०—चल हो एकीकडे! तुम्ही स्त्रिया म्हणजे अशा नीच आहां कीं, तुमच्यावर अनुरक्त होणाऱ्याला तुम्ही अगदीं कस्पटासारखे समजतां....

### पद. ( चाल—कवणें तुज गांजियलें, )

लक्ष्मीसम चंचल या वारकामिनी ॥
दहनभूमिघटिकेसम त्याज्य बुधजनीं ॥ धृ० ॥
धनलोभें हसति रडति ॥ सहज नरा नागवीति ॥
पुरुषांचें चित्त हरिति ॥ मन अपुलें कधिं न देति ॥
होतां तो निर्धन अति ॥ धिक्कारुनि टाकिताति ॥
रंग पिळुनि अळिता जणुं देति फेंकुनी ॥ १ ॥

मद०—अरे पण माझ्या हातून अशी चूक तरी काय झाली?

शर्वि०—चल बोलूं नकोस—

## साकी.

एकावरि मन ठेवुनि नेत्रें खूण करिति दुसऱ्याला ॥
प्रेमवृष्टि तशि एकावरतीं संगमसुख भलत्याला ॥
ऐशा या कुलटा ॥ यांचा संग नको खोटा ॥ १ ॥

—अरे दुष्टा चारुदत्ता, होतास कीं नव्हतास असें करून टाकतों.

( जाऊं लागतो. )

मद०—( त्याचा पदर धरून ) अरे, असें असंबद्ध भाषण करून व्यर्थ कां रागावतोस?

शर्वि०—व्यर्थ कसा रागावतों?

मद०—अरे, हे दागिने माझ्या धनिणीचे आहेत; तिनें आपणांसाठीं करविले होते.

शर्वि०—( त्रासानें ) मग म्हणतेस तरी काय ?

मद०—हे तिनें चारुदत्ताजवळ ठेवायला दिले होते.

शर्वि०—त्याच्याजवळ कशाकरितां दिले ?

मद०—( त्याच्या कानाशीं लागून ) अशाकरितां.

शर्वि०—अरेरे, तर मग फार वाईट गोष्ट झाली माझ्याकडून !

वसंत०—[ मनांत ] काय ह्याला पश्चात्ताप झाला ! यावरून यानें समजून उमजून कांहीं हें काम केलें नाहीं असें दिसतें.

शर्वि०—आतां पुढें कसें करावें बरें ?

मद०—पुढें काय करावयाचें हें मला बायकोला काय समजतें ?

शर्वि०—छे ! असें कसें म्हणतेस !—

## साकी.

पांडित्य वसे स्त्रीच्या अंगीं जन्मापासोनी तें ॥
बहु शास्त्रांच्या अभ्यासानें परि तें पुरुषा येतें ॥
अनुभव हा सकलां ॥ या गुणीं तुम्ही न अबला ॥ १ ॥

मद०—शर्विलका, माझें ऐकशील तर हे दागिने त्या श्रेष्ठ चारुदत्ताला नेऊन दे.

शर्वि०—वा, म्हणजे त्यानें मला आयतेंच चावडीवर न्यावें !

मद०—भलतेंच; चंद्रापासून कधीं ताप झाला आहे का ?

वसंत०—[ मनांत ] शाबास मदनिके !

शर्वि०—तें खरें, पण दुसरा कांहीं तरी उपाय सांग.

मद०—बरें, असें कर आतां; तूं चारुदत्ताचा दूत हो, आणि हे दागिने त्यांनीं पाठविले आहेत असें सांगून ताईसाहेबांना दे.

शर्वि०—म्हणजे काय होईल ?

मद०—एक तर तूं चोर होणार नाहींस; दुसरें, चारुदत्त ऋणमुक्त होईल आणि ताईसाहेबांचे दागिने ताईसाहेबांना मिळतील.

शर्वि०—हें तर मोठेंच साहस !

मद०—छे ! असें न करशील तर मात्र साहस खरें.

वसंत०[ मनांत ] शाबास मदनिके, तूं दासी असून कुलीन स्त्रीप्रमाणें मसलत दिलीस, तेव्हां तुला दासी कोण म्हणेल ?



शार्विं०-हे दागिनें संभाळणें कठीण पडते म्हणून येवढे तूंच संभाळ.

शर्वि०—पण तिची गांठ कशी पडणार ?

मद०—अरे, त्या इकडे येत आहेत. तूं बाजूला उभा रहा, आणि मीं बोलाविलें म्हणजे ये.

शर्वि०—बरें तर. [ जातो. ]

[ वसंतसेना पुढें येते. ]

मद०—[ वसंतसेनेजवळ जाऊन ] ताईसाहेब, चारुदत्ताकडून कोणी ब्राह्मण आला आहे.

वसंत०—त्यांच्याकडून आला आहे, असें तुला कसें समजलें ?

मद०—[ गोंधळून ] त्यांत काय कठीण ?

वसंत०—येऊं दे त्याला आंत.

[ मदनिका शर्विलकास वसंतसेनेकडे आणते ]

वसंत०—भटजीबोवा, नमस्कार करते. या आसनावर बसा.

शर्वि०—तुझें कल्याण असो. [ खालीं बसून ] श्रेष्ठ चारुदत्ताची तुला विनंती आहे कीं, आमचा वाडा जुना होऊन मोडकळीला आला आहे, तेव्हां हे दागिने संभाळणें कठीण पडतें. म्हणून एवढे तूंच संभाळ.

[ मदनिकेच्या हातीं गांठोडी देऊन जाऊं लागतो. ]

वसंत०—भटजीबोवा, जरा थांबून माझा उलट निरोप त्या श्रेष्ठ चारुदत्ताला जाऊन कळवा.

शर्वि०—[ मनांत ] आतां तिकडे जाणार तरी कोण लेक ! [ उघड ] कोणता निरोप घेऊन जाऊं ?

वसंत०—ही मदनिका आपण न्यावी.

शर्वि०—म्हणजे ? यांतला अभिप्राय मला नाहीं समजला.

वसंत०—तुम्हांला नाहीं पण मला समजला.

शर्वि०—तो कोणता ?

वसंत०—श्रेष्ठ चारुदत्तानें मला सांगितलें आहे कीं जो मनुष्य हे अलंकार आणून देईन त्याला तूं आपली मदनिका द्यावी.

शर्वि०—[ मनांत ] हिनें ओळखलें रे ओळखलें ! [ उघड ] चारुदत्ता, धन्य आहे तुझी.

वसंत०—अरे गाडी जोडून आणा रे, गडे मदनिके.—

पद. ( चाल—प्रियकर माझे भ्राते. )

या विप्राच्या करीं तुला मीं आज गडे दिधलें ॥ जाइं तयासह नेत्र असे कां अश्रुजलें भरलें ॥ भेट मला तूं एकवार गे मन हें गहिंवरलें ॥ स्मरण असूं दे सखये माझें अधिक न मी बोलें ॥ १ ॥

मद०—ताईसाहेब—

येते आतां प्रेम असावें पूर्वींपरि अपुलें ॥ गरिब दासि मी या पायांची स्नेहा अंतरलें ॥ कधीं बोलतां विनोदांत ही जरि चुकलें असलें ॥ क्षमा करावी हीच विनंती मान्य करा झालें ॥ २ ॥

( रडत रडत पायां पडते. )

वसंत०—या भटजीबोवांनीं तुझा स्वीकार केला, तेव्हां आतां मीच तुझ्या पायां पडतें, ऊठ, जा बरें.

शर्वि०—वसंतसेने, तुझें कल्याण असो ! ( जाऊं लागतात. )

( पडद्यांत शब्द होतो. )

" कोण आहेरे येथें ? कोतवालाची अशी आज्ञा आहे कीं, आर्यक नांवाचा गोपालपुत्र राजा होणार असें कोणी सिद्धानें भविष्य केल्यावरून पालक राजानें त्याला बंदींत टाकिलें आहे, तर सर्वांनीं सावधागिरीनें रहावें !"

शर्वि०—काय ! पालकराजानें माझा मित्र आर्यक बद्ध करून नेला काय ? काय करावें आतां ! इकडे प्रियेचा मोह सोडवत नाहीं आणि तिकडे मित्राचा स्नेह तोडवत नाहीं. दोन्हींकडून संकट !

साकी.

स्नेही वनिता दोन्ही प्रिय बहु या लोकीं मनुजाला ।
प्रिय मित्रचि तो शतवनिताधिक परि या काळीं सजला ॥
योग्य असे त्यातें ॥ जावें मुक्त करायातें ॥ १ ॥

( जातो. चेटी येते. )

चेटी—( वसंतसेनेस ) ताईसाहेब ! चारुदत्ताकडून कोणी ब्राह्मण आला आहे.

**वसंत**०--आज हा सुदिनच उगवला म्हणायचा ! जा त्याला आंत घेऊन ये.

( बाहेर जाऊन मैत्रेयाला घेऊन येते. )

**चेटी**--भटजीबोवा या असे.

**मैत्रे**०--ओहोहो ! काय भाग्य या वसंतसेनेचें ? घिवर, साखरफेण्या, मोतीचूर, जिलब्या, केशरीभात, खमंग वडे, घारगे, मोदक, श्रीखंड इत्यादि पक्वान्नांचे ढीगच्या ढीग पडले आहेत हे ! पण व्यर्थ. मला कोणी असें म्हणेना कीं, " भटजी या, आणि एखादा मोदक नाहीं तर एखादी जिलबी खाऊन थोडेंसें पाणी प्या. " नाहीं पण हिचें सुख स्वर्गांतल्या अप्सरांना देखील मिळत नसेल ! सात चौक ओलांडून आलों पण इंद्रलोक, चंद्रलोक अशा सप्तलोकांतूनच आलों असें वाटतें. काय हें वैभव ! केवढी ही श्रीमंती ! आपले डोळे अगदीं दिपून गेले !

**वसंत**०--यावें मैत्रेयभटजी, या आसनावर बसावें.

**मैत्रे**०--( बसून ) तूंहीं बैस.

**वसंत**०--आर्या, श्रेष्ठ चारुदत्त खुशाल आहे ना ?

**मैत्रे**०-- हो हो, खुशाल आहे.

**वसंत**०--

**पद. ( चाल लावणीची )**

**शाखा सद्गुण जया पालवी विनयाची साजिरी ॥ विश्वा-**
**साचीं मुळें दयेची छाया पडली बरी ॥ निजाचार हें प्रकांड**
**कुसुमें चारित्र्याचीं बरीं ॥ उपकारादर फळें मधुर तीं**
**सर्वहि काळीं धरीं ॥ ऐसा सज्जनरूपविटप हो मिळतां**
**त्याच्या वरीं ॥ सुहृत्पक्षिगण वास सदा तो आनंदानें करी ॥ १ ॥**

**मैत्रे**०--[ मनांत ] या दुष्ट गणिकेनें खरा प्रकार ताडला वाटतें ( उघड ) हो यांत काय संशय ! तूं म्हणतेस तसेंच आहे.

**वसंत**०--बरें भटजी, आज इकडे कशाकरितां येणें केलेंत ?

**मैत्रे**०--श्रेष्ठ चारुदत्ताची तुला हात जोडून अशी विनंति आहे--

**वसंत**०--( हात जोडून ) त्यांची काय आज्ञा आहे ?

**मैत्रे०**– ही कीं, तूं जे सुवर्णालंकार विश्वासानें माझ्यापाशीं ठेविलेस, ते माझेच्च असें समजून मीं द्यूतांत गमाविले आणि ज्या द्यूतकारानें ते जिंकून घेतले तो राजाचा अपराधी असून प्रस्तुत कोठें आहे हें समजत नाहीं.

**वसंत०**–( **मनांत** ) काय, चोरानें नेले असून द्यूतांत घालविले म्हणतो ! चारुदत्ता, या तुझ्या गुणावरून प्राण ओंवाळून टाकावे असें वाटतें. ( **उघड** ) बरें पुढें ?

**मैत्रे०**–म्हणून त्याच्या मोबदला ही रत्नमाला आपण घ्यावी.

**वसंत०**–( **मनांत** ) ते अलंकार याला दाखवूं का ? पण नको; पुढें काय म्हणतो तें ऐकूं.

**मैत्रे०**–कां, ही रत्नमाला का घेत नाहींस ?

**वसंत०**–आर्या, त्या सज्जनानें पाठविलेली रत्नमाला मी कशी घेणार नाहीं बरें ? आणा इकडे ( **मनांत** ) काय आश्चर्य हे ! फुलांचा भर गेला तरी सहकारतरूपासून मकरंदबिंदू पडतातच. ( **उघड** ) मैत्रेया त्या द्यूतकाराला माझा निरोप सांगा कीं, मीही संध्याकाळीं आपल्या दर्शनाला येणार आहे.

**मैत्रे०**–( **मनांत** ) ही त्याच्याकडे जाऊन आणखी कांहीं मागणार आहे वाटते. ( **उघड** ) मीं सांगेन त्याला–( **एकीकडे** ) कीं गणिकेच्या प्रसंगापासून दूर रहा म्हणून . ( **जातो.** )

**वसंत०**–अगे चेटी, ही रत्नमाला घे आणि चल माझ्याबरोबर चारुदत्ताकडे.

**चेटी**––पण ताईसाहेब, हें पहा आभाळ भरून आलें आहे. ही जायची वेळ नव्हे.

**वसंत०**––

**ठुंबरी.** [ चाल––व्यर्थ अम्ही अबला. ]

**रमवाया जाऊं ॥ प्रियासी ॥ रमवाया जाऊं ॥ धृ० ॥**
**मेघ असो कीं रात्र असो ही ॥ पर्जन्याची वृष्टि पडो ही ॥**
**भीति तयाची मजला नाहीं ॥ विघ्न कांहीं येऊं ॥ १ ॥**

**अंक तिसरा समाप्त.**

———

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला—बाग.

मैत्रे०[ प्रवेश करून ] ह्या गणिकेचा केवढा तरी लोभाविष्टपणा आणि केवढा तरी कृपणपणा हा ? आश्चर्य हें ! दुसरी तिसरी कांहीं गोष्ट न काढिता तिनें ती रत्नमाला मुकाट्यानें घेतली. एकदां तरी नाहीं म्हणायचें होतें ! तसेंच दुसरें, तिची इतकी संपत्ति, पण इतकें देखील म्हणाली नाहीं कीं "अहो मैत्रेय भटजी, तुम्ही फार थकलेले दिसतां, तर थोडीशी सुंठसाखर खाऊन घोटभर ऊन पाणी प्या." छे, फार दुष्ट स्वभाव ! म्हणतात तें खरें. कंदावांचून कमळ, कलहावांचून ग्रामसंबंध, विश्वासु सोनार आणि निर्लोभी गणिका, हीं सांपडणें फार कठीण. तर आतां कसेंही करून आपल्या मित्राला या गणिकेच्या नादापासून सोडविलें पाहिजे. तेव्हां त्याची आर्धी गाठ घ्यावी. [ **पडद्याकडे पाहून** ] कायरे वर्धमानका, श्रेष्ठ चारुदत्त कोठें आहे ? काय म्हणतोस, वृक्षवाटिकेंत बसला आहे ? बरें तर तिकडेच जावें, [ जातो ]

चारु०—[ आसनावर बसून ] हें आज अकालींच दुर्दिन उद्भवलें—

**पद. (चाल—मल्हार, त्रिताल. )**

**आनंदें नटती ॥ पाहुनि ज्या गृहमयूरपंक्ती ॥ धृ० ॥**
**गमनोत्सुक हे हंस असुनियां ॥ धैर्य नसे त्यां गमन कराया ॥**
**कामुकगगनासम रोधाया ॥ मेघ पहा फिरती ॥ १ ॥**

**दिंडी.**

**बघुनि वाटे या नील पयोदातें । हरिच दुसरा कीं आक्रमी नभातें ॥ बलाकांची शंखसी करीं माला । तडित्पीतांबर बांधिला कटीला ॥ १ ॥**

**पद. ( त्रिताल. )**

**चपलासंगें या जलधारा ॥ दिसति विमल रजताच्या तारा ॥**
**सौदामिनिच्या स्फुरणें होती ॥ नष्ट परीक्षण दृश्य मागुती ॥**
**भासे जणुं भूमीवरि पडती ॥ गगनपटाच्या दशा झरारा ॥ १ ॥**

## पद. ( चाल—नोहे नारी ही. )

कांहीं दिसती हे मेघ नभींचे ।। बक हंसाचि साचे ।। जलधि-
क्षोभें उंच उसळले कांहिं संघ मीनामकरांचे ।। धृ० ।। दुसरे
भासति हे नृपमंदिरसे ।। किति तुंग गिरीसे ।। वातें हाल-
वितां बहु त्यासरसें ।। पय धरिती ऐसे ।। यांच्या तिमिरानें
जग भरलेंसे ।। मजला हें भासे ।। खल शिखि गर्जति आनं-
दानें, कोकिल धरिती मार्ग वनींचे ।। १ ।।

——मैत्रेयाला इतका वेळ कां लागला बरें ?

मैत्रे०—–( येऊन ) का मित्रा, आज वाटिकेंतसा येऊन बसलास ?

चारु०——कोण ? मैत्रेया आलास, ये बैस.

मैत्रे०——हो बसतों.

चारु०——इतका उशीर कां लागलारे ? असो; पण तूं ज्या कामाला गेला होतास त्याचें काय झालें ?

मैत्रे०——मित्रा, तें कार्य बिघडलें !

चारु०——कां, तिनें रत्नमाला घेतली नाहीं वाटतें ?

मैत्रे०——इतकें कोठें आहे आमचें दैव. तिनें आपल्या कमलासारख्या कोमल हातांची अंजलि करून ती घेऊन आपल्या मस्तकावर धरली.

चारु०——तर मग बिघडलें म्हणून काय म्हणतोस ?

मैत्रे०——बिघडलें नाहीं तर काय ? अरे, ज्यांचा उपभोग आपण एक दिवसही घेतला नाहीं, आणि ज्यांचें मोलही फारसें नाहीं अशा त्या अलंकारा-करितां चतु:समुद्रांतील सारभूत ती रत्नमाला घालविलीस, याहून बिघडायचें तें काय ? मीं म्हटलें, ती रत्नमाला घेणार नाहीं. पण ती कसली लोभी ! तिनें घेतली ती घेतलीच.

चारु०——मित्रा; असें म्हणूं नकोस, कारण——

## साकी.

मजवरि ठेवुनि बहु विश्वासा ठेव ठेविली होती ।।
मूल्य तयाचें अलंकार तो ऐसें आणी चित्तीं ।।
कुतर्क कां करिसी ।। व्यर्थचि दोष तिला देशी ।। १ ।।

मैत्रे०—मित्रा, मला संतापायला दुसरें एक कारण झालें. ती माझ्याकडे पाहून आपल्या दासीला खुणावून तोंडाला पदर लावून खदखदां हंसली ! असा तिनें माझा उपहास केला. यासाठीं मित्रा, मी म्हातारा ब्राह्मण तुला हात जोडून अशी विनंति करितों कीं, अतःपर हा जननिंद्य जो वेश्यासंबंध त्याचा त्याग कर. अरे, ह्या वेश्या म्हणजे जोडयांतल्या खडयासारख्या आहेत; लवकर निघत नाहींत आणि खुपल्यावांचून रहात नाहींत.

चारु०—मित्रा, आतां ही निंदा पुरे कर. माझ्या अवस्थेनेंच मला प्रसंगांतून काढिलें आहे. कसें म्हणशील तर पहा—

**पद. ( चाल–लोपविली बहुत शोभा. )**

हतबल तो अश्व वेगें धांवाया लागतां ॥
नुचलति बा चरण त्याचे बहु यत्नें उचलितां ॥
मन तैसें निर्धनाचें चोंहिकडे धांवतें ॥
परि होतां खिन्न येतें स्वस्थानीं मागुतें ॥ १ ॥

—दुसरी तुला एक गोष्ट सांगतों कीं, मला तिची आशाच नाहीं. कारण—

**साकी.**

धन ज्या जवळी स्त्री त्याची बा धनवश ती नवरामा ॥
(मनांत " छे छे, गुणवश ती नवरामा ॥) परि त्यजिलें मज
धनें म्हणुनि म्यां त्यजिली तीहि सुकामा ॥

मैत्रे०—[ मनांत ] हा वरतीं पाहून दीर्घ श्वास सोडतो आहे; यावरून असें दिसतें कीं, मी याचें इतकें निवारण केलें तरी याची उत्कंठा अधिकच वाढली. तस्मात् मदनाची गति वक्र म्हणतात तें खोटें नाहीं. [ उघड ] मित्रा, मी वसंतसेनेचा निरोप घेऊन निघालों त्यावेळेस ती म्हणाली, भटजी, आज संध्याकाळीं मी तुम्हांला भेटायाला येणार आहे, असें चारुदत्ताला सांगा. यावरून माझा तर्क असा वाहतो कीं, ती रत्नमालेनें संतुष्ट झाली नाहीं म्हणून कांहीं तरी अधिक मागायला येत असेल.

चारु०—येऊं दे आली तर; संतुष्ट होऊन जाईल.

[ कुंभीलक नांवाचा चेट येतो. ]

कुंभीलक—हा श्रेष्ठ चारुदत्त येथें बसला आहे, आणि तो द्वाड भटही

तेथें जवळच आहे. असो; आपण वसंतसेनेच्या आज्ञेप्रमाणें तिचा निरोप चारुदत्ताला कळवावा. (पुढें जाऊन) अरे, पण हा बागेचा झांपा लावला आहे; आता आंत कसें जावें? त्या भटाला कांहीं खूण करावी, म्हणजे तो इकडे येईल. ( मातीचीं ढेंकळें त्याला मारतो. )

मैत्रे०--अरे, कुंपणांतल्या आंब्याच्या झाडावर जशीं ढेंकळें मारावीं, तशीं ढेंकळें मला कोण मारितो ?

चारु०--अरे, बंगल्याच्या सज्जावर पारवे क्रीडा करीत असतील त्यानें माती पडली असेल; ढेकळें कोण मारितो ?

मैत्रे०—अरे रांडलेका, दुष्ट पारव्या, दांडक्यानें पाडाचा आंबा जसा पाडावा तसा तुला खालीं पाडतों. [ मारावयास उठतो. ]

चारु०—मित्रा, बैस खालीं. [ धोतर धरतो ] तो गरीब बिचारा पारवा आपल्या स्त्रीबरोबर क्रीडा करीत असेल, त्याला कां उगीच उपद्रव ?

कुंभी०--काय हा मूर्ख भट ! त्या पारव्याकडे पाहतो आहे ! [ पुनः ढेंकळें मारतो. ]

मैत्रे०—अरेच्या ! पुनः ढेंकूळ ! [ चोहोंकडून पाहून ] अरे हा कुंभीलक ! आलों आलों; थांब. [ जाऊन झांपा उघडून ] ये आंत. कायरे, अशा अंधारांतून पावसांतून इकडे कोणीकडे ?

कुंभी०—अहो ही ती–

मैत्रे०—कोण ? ही ती कोण ?

कुंभी०—अहो आपली ती ही--

मैत्रे०-अरे ही ती, ती ही असें काय करतो ? नीट सांग.

कुंभी०-तुम्ही तरी कोण ही ती, कोण ही ती, असें काय विचारतां ? नीट विचारा !

मैत्रे०-बरें नीट सांग कोण ती ?

कुंभी०-आतां याला दुसऱ्या रीतीनें सांगावें. ( उघड ) भटजी, आंब्याला मोहोर कोणत्या ऋतूंत येतो ?

मैत्रे०-मूर्खा, ग्रीष्म ऋतूंत.

कुंभी०-विचार करा.

मैत्रे०–[ **चारुदत्ताजवळ येऊन** ] मित्रा, ज्यांत आंब्याला मोहोर येतो तो ऋतु कोणता ?

चारु०–अरे, वसंत.

मैत्रे०–( **कुंभीलकास** ) मूर्खा, वसंत.

कुंभी०–बरें, धनकनकसंपन्न राष्ट्राचें रक्षण कोण करितो ?

मैत्रे०–मूर्खा, रस्ते.

कुंभी०–नीट विचार करा.

मैत्रे०–( **चारुदत्ताजवळ येऊन** ) मित्रा, धनकनकसंपन्न राष्ट्राचें रक्षण कोणरे करितो ?

चारु०–अरे, सेना.

मैत्रे०–[ **कुंभीलकास** ] अरे, सेना.

कुंभी०–बरें, माझ्या दोन्ही प्रश्नांचें उत्तर आतां एकदम द्या.

मैत्रे०–सेना वसंत.

कुंभी०–पदें फिरवून सांगा.

मैत्रे०–[ **पाय फिरवून** ] सेना वसंत.

कुंभी०–अहो, शब्दांचीं पदें फिरवून सांगा.

मैत्रे०–हं ! हं ! वसंतसेना आली होय ? तरीच ! तर मग चारुदत्ताला कळविलें पाहिजे. ( **जवळ जाऊन** ) मित्रा, तुझा धनिक तुला भेटायला येणार आहे.

चारु०–माझा धनिक ? आमच्या सर्व कुलाला धनिक हा शब्दच ठाऊक नाहीं.

मैत्रे०–कुलाला नाहीं, पण तुला तो आतां प्रत्यक्ष दर्शन देणार आहे.

चारु०- असें काय ? नीट सांग काय तें.

मैत्रे०–नीट सांगूं ? वसंतसेना तुला भेटायला येत आहे.

चारु०–उगीच चेष्टा करितोस वाटतें माझी ?

मैत्रे०–खोटें वाटत असेल तर या कुंभीलकाला विचारून पहा.

चारु०-खरेंच कायरे कुंभीलका, वसंतसेना येत आहे ?

कुंभी०–होय महाराज; अगदीं निघाल्या आहेत, आणि हेंच कळवायला त्यांनीं मला पुढें पाठविलें आहे.

**चारु०**—शाबास ! तूं मला आनंदाचें वर्तमान सांगितलेंस, याकारितां हें घे बक्षीस. [ **शेला देतो.** ]

**कुंभी०**-( **शेला घेऊन मुजरा करून निघून जातो.** )

**मैत्रे०**—मित्रा, ही इतक्या अंधारांतून कां येत आहे समजलास ? तूं दिलेली रत्नमाला हलक्या मोलाची, आणि तिचे दागिने बहुमोलाचे म्हणून आणखी कांहीं मागायला येत आहे.

**चारु०**—अरे, येऊं दे. आली तर संतुष्ट होऊन जाईल. अरे, ही पहा पावसाची सर अगदीं अंगावर आली; तर ही सरेपर्यंत आपण आंतल्या चौकांत तिची वाट पहात बसूं चल. ( जातात. )

( वसंतसेना; तिचा विट व एक दासी प्रवेश करितात. )

**विट**—

**पद.**[ चाल—आम्ही काशीचे ब्राह्मण. )

जरि नाहिं कमल तें करीं, तरिहि सुंदरी, दिसे दुसरी, कामुका इंदिरा खरी ॥ १ ॥ ही कामाची तलवार, करिल ज्या वार, ठार तो समजा, नवमदनमांजिरी उमजा ॥ २ ॥ मानी कुलकामिनी, सहज ही बघुनि, मूर्ति नयनीं, झुरणीस लागती मनीं ॥ ३ ॥ ऐसी लीलावती, कराया रती, प्रियासह ती, चालली नदुन गजगती ॥ ४ ॥

—आर्ये, वसंतसेने, पाहिलास कां हा चमत्कार ?—

**पद.** ( चाल—" पंचतुंड नररुंड " )

पंकें भरलीं वदनें ज्यांचीं ऐसे दर्दुर जल पीती ॥
केकावति मदभरें शिखंडी सुप्रसन्न हे तरु दिसती ॥ १ ॥
साधुनराला दुर्जन ऐसे लोपविती घन चंद्राला ॥
कुलटेसम ही एके ठायीं नच राहे चंचल चपला ॥ २ ॥

**वसंत०**—विटा, तूं म्हणतोस तें खरें आहे; तसेंच हे मेघ गर्जना करितात, हें ऐकून मला वाटतें कीं, ही रात्रच माझ्याशीं मोठ्या रागानें भांडायला येत आहे.

**विट**—असें कशावरून म्हणतेस ? तिचा तुझा कांहीं सवतीमत्सर आहे कीं काय ?

**वसंत०**— अरे हो; सवतीमत्सर नाहीं तर काय ! ती मला असें म्हणत असेल—

**पद.** ( चाल—येतें आलें थांब मी जलदी. )

**किति कपटि असासि तूं सवती ॥ रतिरंगीं मन दंगाचि असतां, आलिस काशि एकांतीं ॥ धृ० ॥ लग्नपयोधर शशिकांता मी, नाहीं कशी तुज भीति ॥ २ ॥ ऐसें गर्जुनि कुपित निशा ही, रोधितसे कीं माझि गतीं ॥ ३ ॥**

**विट**—तर मग या रात्रीची निंदाच केली पाहिजे.

**वसंत०** — अरे निंदा करून काय फळ ! स्त्रीजातीचा स्वभावच असा तुला मी एक सांगतें—

## साकी.

**मेघांनीं बहु वर्षुनि गर्जुनि अशनिपात जरि केला ॥**
**मानिति नच त्या प्रियाकडे ज्या नियति जावया बाला--**

**विट**--आर्ये वसंतसेनें, हा पाहिलास कां दुसरा चमत्कार--

**पद.** ( चाल—लग्नाला जातों मी )

**नोहे हा पवन जवन वारु भासतो ॥ जलधारा शरभारचि काय वर्षतो ॥ धृ० ॥ गर्जत घनभेरि महा ॥ चपलाध्वज झळकत हा ॥ हरुनि मेघभूप पहा ॥ नेतो शशिकर समुहा ॥ जेवि सबल नृप परकरभार नेत तो ॥ १ ॥**

**वसंत०**—अरे विटा, या दुष्ट मेघांचें नीच कर्म पाहिलेंस का ?

**विट**—तें कोणतें ?

**वसंत०**—

**पद.** (चाल—अरसिक किती हा शेला. )

**अवचित या मेघांनीं ॥ शशिकांति चोरिली संधी साधुनि ॥धृ०॥ भर्ता निर्बल मानुनि ॥ न्यावी तयाची स्त्री बहुतांनीं ॥ तैसें या**

मेघांनीं ॥ शशिकांति चोरिली संधी साधुनि ॥ १ ॥

विट—तसेंच या दुष्ट मेघांच्या योगानें या दाही दिशा देखील पहा कशा निस्तेज दिसतात त्या !

वसंत०—[ मेघाकडे पाहून ]

पद. ( चाल—रामकरीं जरि नृपपद गेलें. )

निर्लज्जा मी प्रियसङ्गनाला ॥ जातां भिवविसि कां तूं मजला ॥
लावुनि जलधाराकर तनुला ॥ स्पर्श कसा करिसी ॥ १ ॥
—[ ऐकत नाहीं पाहून ] मेघा !—
आरड सोडीं बहु जलधारा ॥ पाड विजा कीं वर्षीं गारा ॥
स्त्रिया निघति ज्या रमणमंदिरा ॥ भीति न त्या तुजला ॥ १ ॥
बाई चपले—

## अंजानीगीत.

कठिण असे गे मन पुरुषाचें ॥ करुणा नाहीं हृदयीं त्याचे ॥
परि तूं स्त्री मग या अबलेचें ॥ दुःख न जाणसि कां ॥ १ ॥

विट—आर्ये वसंतसेने, तूं या विजेची निंदा करितेस हें ठीक नाहीं. हिचा तुझ्यावर केवढा उपकार आहे पाहिलास ?—

## साकी.

मधुनि मधुनि ही चमके ऐसी गगनीं म्हणुनिच दिसतो ॥
गाढतमीं या प्रियसङ्गनाचा स्पष्टचि मार्ग तुला तो
निंदिसि कां तीतें ॥ स्मरसि न कां या उपकृतितें ॥ १ ॥

वसंत०—[ कांहीं पुढें जाऊन पाहून ] विटा, आर्य चारुदत्ताचा वाडा हाच नव्हे काय?

विट—होय हाच. आर्ये वसंतसेने, तूं सकलकलाभिज्ञ आहेस, चतुर आहेस, तेव्हां मीं तुला उपदेश करावा असें नाहीं; परंतु स्नेहास्तव राहवत नाहीं म्हणून सांगतों, कीं त्या चारुदत्ताची आणि तुझी गांठ पडल्यावर त्याच्यावर अत्यंत कोप करूं नकोस. कारण—

## दिंडी.

फार कोपें रतिसौख्य होत नाहीं ॥ कोप नसतां
काम तो विरस होई ॥ स्वल्प कोपुनि कोपवी
अल्प त्यातें ॥ तुष्ट होउनि तोपवी स्वप्रियातें ॥ १ ॥

**वसंत०**—बरें, मी आलें आहें म्हणून त्या श्रेष्ठ चारुदत्ताला कळीव.

**विट**—ठीक आहे. [ **चारुदत्ताजवळ जाऊन** ] महाराज,

### पद. (चाल–माझें हृदय पोळत.)

बहु नीपतरू फुलुनी डुलति हें कदंबही तयापरी ॥ धृ० ॥
जलदाकुल गगन अशा समयिं सुंदरी ॥
स्मरशरहत मुदितमना येत मंदिरीं ॥
मेघजलें आर्द्रवसनकेशही शिरीं ॥
विद्युद्घनघोररवें फार घाबरीं ॥
ती कर्दममय चरण धूत राहिलिसे द्वारीं ॥ १ ॥

**चारु०**—[ **मैत्रेयास** ] मित्रा, कोण आली आहे पाहून ये.

**मैत्रे०**— [ **वसंतसेनेकडे जाऊन** ] कोण तूं का ? ये.

**वसंत०**—आर्या, मी नमस्कार करतें.

**मैत्रे०**—तुझें कल्याण असो.

**वसंत** ( **विटास** ) ही छत्रधारिका चेटी हवी तर परत जातांना तुझ्या उपयोगीं पडेल.

**विट**—असो.( **मनांत** ) या युक्तीनें हिनें हिला व मला परत जायला सुचविलें. [ **उघड** ] वसंतसेने मी जातों, पण इतकें लक्षांत ठेव–

### पद. ( चाल—अस्तमान झाला. )

कपटानृतभूमी ॥ मायादंभ गेह नामी ॥ धृ० ॥
केवळ रतिकेलीचें मंदिर ॥ सुरतोत्सवसौख्याचें आगर ॥
ऐसी गणिकातनु ही सुंदर ॥ म्हणुनि कामहोमीं ॥
चतुरें तोषवि तो कामीं ॥ १ ॥

[ जातो. ]

**वसंत**०—आर्या मैत्रेया, तुमचा द्यूतकार कोठें आहे ?

**मैत्रे**०–[**मनांत**] वाहवा! द्यूतकार म्हणून माझ्या मित्राला हिनें मोठाच मान दिला! ( **उघड** ) अगे, तो शुष्कवृक्षवाटिकेंत बसला आहे.

**वसंत**०—तुमची शुष्कवृक्षवाटिका ती कोणती ?

**मैत्रे**०—अगे, जेथें कोणी खात नाहीं, पीत नाहीं, ती शुष्कवृक्षवाटिकाच.

**वसंत**०— ( **हंसत** ) असें का ?

**मैत्रे**०—तूं आंत जा.

**वसंत**० —( **चेटीस** ) अगे, पण मी आंत जाऊन बोलूं काय बाई ?

**चेटी**--ताईसाहेब, इतकेंच बोला कीं, अहो द्यूतकार ! हा प्रदोपसमय तुम्हांला शुभ आहेना ?

**वसंत**०—असें कसें बोलवेल माझ्याच्यानें ?

**चेटी**--मुद्दाम नको बोलायला. त्यांच्यापुढें गेलांत म्हणजे आपोआपच येईल तोंडांतून.

**मैत्रे**०—हं, वसंतसेने चल आंत.

**वसंत**०--[ **आंत जाऊन चारुदत्ताच्या अंगावर फुलें फेंकून** ] का द्यूतकार, हा प्रदोपसमय तुम्हांला सुखावह आहेना ?

**चारु**०--( **तिच्याकडे पाहून उठून** ) काय वसंतसेना आली ? वसंतसेने !--

## साकी.

प्रदोष माझा आजवरी तो जागरींच कीं गेला ॥
विरहश्वासा सोडित सखये निशाकाल दवडीला ॥
गांठ तुझी पडतां ॥ होइल आतां सुखदाता ॥१॥

--प्रिये, या आसनावर बैस.

**मैत्रे**०—हो हो; तुझ्याकरितां हा गालिचा मुद्दाम घातला आहे. बैस यावर. [ **सर्व बसतात.** ]

**चारु**०--मित्रा मैत्रेया--

## दिंडी.

श्रवणि सखिच्या कादंब कुसुम पाहे ।। स्तनांवरि तें
जलबिंदु ढाळिताहे ।। मला वाटें युवराजपदीं हातें ।।
भूपतनया अभिषेक जणुं करीते ।। १ ।।

—मित्रा, हिचीं दोन्ही वस्त्रें अगदीं भिजून गेलीं आहेत. तर हिला दुसरीं कोरडीं आणून दे.

**मैत्रे०**-( **कुरकुरत** ) हो आणतों.

**चेटी**—भटजी, बसा तुम्हीं, मी देतें आणून.

**मैत्रे०**—( **एकीकडे** ) मित्रा, माझ्या मनांत हिला कांहीं विचारायचें आहे; विचारूं कायरे ?

**चारु०**—हो हो, खुशाल विचार.

**मैत्रे०**—कायगे वसंतसेने, तूं अशा पावसातून, काळोख्यातून इकडे गे कोणीकडे आलीस ?

**चेटी**——ताईसाहेब, हा ब्राह्मण अगदीं भोळा दिसतो. मी याला उत्तर देतें.

**वसंत०**—अगे, भोळा बरा असेल ! पक्का शाहाणा आहे तो.

**चेटी**——अहो भटजीबुवा, तुम्हीं आणून दिलेल्या रत्नमालेचें मोल काय म्हणून त्या विचारायला आल्या आहेत.

**मैत्रे०**——[ **एकीकडे** ] तरी मीं याला मघाशीं सांगितलें कीं, तूं दिलेल्या रत्नमालेनें संतुष्ट न होतां दुसरें कांहीं मागायला येत आहे. [ **चेटीस** ] तुला रत्नमालेचें मोल घेऊन काय करावयाचें आहे गे ?

**चेटी**——तसें नव्हे. तुम्हीं जी रत्नमाला आणून दिलीत ती आपली असें समजून ताईसाहेबांनीं द्यूतांत गमावली, व ज्यानें जिंकली त्याचा कोठें ठिकाण नाहीं.

**मैत्रे०**——ऊं: ! ही आमचीच कल्पना. उष्टी ! उष्टी !

**चेटी**——तेव्हां त्या द्यूतकाराचा ठिकाण लागेपर्यंत हे दागिने तुमच्याजवळ असूं द्या. [ **अलंकार दाखविते; मैत्रेय ते पाहून विचार करितो** ], कां फारशी दृष्टि लावून पहातां ? हे दागिने तुमच्या ओळखीचे आहेत वाटतें ?

**मैत्रे०**—नाहीं आपले उगीच कारागिराची कुशलता पाहून माझी दृष्टि तिकडे लागली.

**चेटी**—तर मग तुमच्या दृष्टीनें तुम्हांला फसविलें म्हणायचें ! अहो, ताईसाहेबांनीं तुमच्यापाशीं जे ठेवायला दिले होते तेच हे अलंकार.

**मैत्रे०**—मित्रा, आमच्या घरून चोरीला गेलेले तेच हे अलंकार.

**चारु०**—काय ? तेच हे ? तर मग आमचीं बोटें आमच्याच डोळ्यांत गेलीं म्हणायचीं. असो, पण ही एक आनंदाची गोष्ट समजली पाहिजे.

**मैत्रे०**—हे अलंकार तुम्हांला कोठून मिळाले असें हिला विचारूं का ?

**चारु०**—हो हो, काय चिंता आहे ?

**मैत्रे०**—( **चेटीस** ) हं ? हं ?

**चेटी**—( **मैत्रेयाचे कानाशीं** ) असें **असें**.

**चारु०**—अरे, असे कानांत काय कुजबुजता ? मी कोणी परका आहें कीं काय ? मला कळूं द्या काय तें.

**मैत्रे०**—अरे ही ( **जवळ जाऊन कानाशीं लागून** ) असें सांगतें; विचार हवें तर.

**चारु०**—खरेच काय गे ते अलंकार ?

**मैत्रे०**—मित्रा, आतां कसला संशय ? तेच हे.

**चारु०**—मीं कोणाचें प्रिय वचन कधीं निष्फळ केलें नाहीं. येवढ्याकरितां ही घे आंगठी. ( **आंगठी काढावयास जातो व नाहीं असें पाहून लज्जित होतो.** )

**वसंत०**—( **मनांत** ) यासाठींच तुझ्या संगतीची इच्छा करावी ती !

**चारु०**—( **एकीकडे वळून खेदानें** ) शिव शिव ! काय दुःख हें—

## पद. ( राग कानडा—त्रिताल )

**धनहीन पुरुष जो होई ॥ काय जगीं या जीवित त्याचें, रोष तोषही निष्फल होई ॥ धृ० ॥ दंतावांचुनि भुजंग लोकीं ॥ विपक्ष खग वा शुष्क तरुच कीं ॥ नाहीं जलाचा लव ज्या टाकीं ॥ कोण तयस पाही ॥ १ ॥**

--तस्मात् मित्रा व्यर्थ रे आमचें जिणें ! कारण संतोषकाळीं देखील ही निर्धनता आडवी येते.

**मैत्रे०**-मित्रा, उगीच जिवाला संताप करून घेऊं नकोस. तुझ्याकडे काय दोष आहे ? (**हंसून**) पण कायगे ? ज्यांत हे दागिने बांधिले होते, तो माझा पडदणीचा जुना पंचा कोठें आहे ?

**वसंत०**--आर्या, रत्नमालेनें या जनाची तुलना करणें आपल्याला बरें कसें वाटलें ?

**चारु०**--वसंतसेने, असें जर न करावें तर कसें करावें ? कारण तूंच पहा कीं--

## साकी.

**भूतार्थावरि पौरजनांची श्रद्धा बसेल कैसी ॥**
**संशय माझा येइल त्यांना निंदितील कीं मजसी ॥**
**म्हणुनि असें केलें ॥ तुजला विपरित कां गमलें ॥ १ ॥**

**मैत्रे०**--कायगे वसंतसेने, तूं आज येथेंच निजणार वाटतें ?

**चेटी**--अहो भटजीमहाराज, आपल्याला एवढी रिकामी उठाठेव कोणीं सांगितली आहे ?

**मैत्रे०**--नाहींगे, आपलें सहज विचारलें. पण मित्रा पाहिलेंस कारे, आम्ही येथें सुखानें बसलों आहों हें पाहवेना म्हणून आम्हांला उठविण्या-साठींच जसा काय हा पर्जन्य जलधारा सोडीत पुनः आला.

**चारु०**--मित्रा, हा पहा चमत्कार !--

## पद. ( चाल-- झंपा, प्रबंध. )

**जशीं सज्जनांचीं मनें असति बहुविमल तीं, तेंवि घन वर्षति सुनिर्मल जलें ॥ जिष्णुकरशरततींसमचि धारा गळति ॥ कर्कश ध्वनि करिती वेगामुळें ॥ चंडवातें किती बिंदु भूवरि पडति । शक्रकोशांतलिच मुक्ताफळें ॥ १ ॥**

--आहाहा ! प्रिये वसंतसेने, हा पाहिलास का चमत्कार !--

## पद. ( वसंत बहार, त्रिताल. )

**जलधरसंघें नभ भरलें तें ॥ वासित झालें सौरभवातें ॥ धृ० ॥**

कांता जैसी प्रियतम पतिला ॥ आलिंगन दे, तशि ही चपला ॥
धांवुनि वेगें या मेघाला ॥ प्रेमें आलिंगन बघ देते ॥

( वसंतसेना शृंगारभावानें अभिप्राय समजून चारुदत्ताला आलिंगन देते; चारुदत्तही स्पर्शसुखाचा आनंद दाखवून तिला आलिंगून म्हणतो. )

**साकी.**

मेघा अति गंभीर रवानें करीं गर्जना आतां ॥
स्पर्शें रोमांचित मी झालों आलिंगी मज कांता ॥
मन्मथ संचरला । कदंबसुमता ये तनुला ॥ १ ॥

**मैत्रे०**—अरे दुष्टा दुर्दिना, या मेघगर्जनेनें आणि विद्युल्लतेच्या स्फुरणानें हिला भिववितोस हें चांगलें करीत नाहींस.

**चारु०**—छे छे मित्रा, दुर्दिनाची निंदा करूं नकोस. याचा माझ्यावर मोठा उपकार आहे. कारण याच्या योगानें माझ्या प्रियेनें मला आलिंगन दिलें. अहाहा मित्रा--

**पद. ( राग माकलंस, त्रिताल. )**

तेचि पुरुष दैवाचे ॥ धन्य धन्य जगि साचे ॥ धृ० ॥
अंगें भिजलीं जलधारांनीं ॥ ऐशा ललना स्वयें येउनी ॥
देती आलिंगन ज्यां धांवुनि ॥ थोर भाग्य त्याचें ॥ १ ॥

**अंक चवथा समाप्त.**

---

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला—स्थळ, चारुदत्ताचा वाडा.

(वसंतसेना व दासी प्रवेश करितात. )

**दासी**—ताईसाहेब, आज आपल्याला उठायला जरा उशीर झाला, नाहीं ?



चारु०--अंगे भिजलीं जलधारांनीं ॥ ऐशा ललना.. देती आलिंगन धांवोनी ॥ (पृ. ६२)

**वसंत**--(**लाजून**) झाला असेल; पण श्रेष्ठ चारुदत्ताची स्वारी कोठें आहे?

**दासी**--वर्धमानकाला सांगून ते मघाशींच पुष्पकरंडकजीर्णोद्यानांत गेले.

**वसंत**०--वर्धमानकाला त्यांनीं काय सांगितलें आहे?

**दासी**--आपल्याकरितां गाडी तयार असूं दे म्हणून.

**वसंत**०--त्या गाडींत बसून मला कोठें जायचें?

**दासी**--कोठें म्हणजे? पुष्पकरंडकजीर्णोद्यानांत.

**वसंत**०--(**मोठ्या आनंदानें**) सखे, अगदीं मनांत होतें तसेंच झालें. काय सांगूं तुला--

## पद. (चाल--आजि शेवटचा लाभ.)

**जरि रात्रीचा काळ सुखाचा गेला ॥ सहवास तयाचा घडला ॥ जरि पाहुनि तें हास्यवदन बहुवेळां ॥ अति तोष मनाला झाला ॥** चाल ॥ **तरि समाधान नयनांचें ॥ नच झालें पुरतें साचें ॥ येईन पुन्हां मी त्याचें ॥** चाल ॥ **सुखदर्शन तें केव्हां ऐसी मजला ॥ उत्कंठा या समयाला ॥ १ ॥**

**दासी**--पण ताईसाहेब, आतां उशीर आपल्याकडेच आहे.

**वसंत**०--असें काय? चल तर ही निघालें मी. पण गाडी कोठें आहे ती?

**दासी**--आतां इतक्यांत वर्धमानक गाडी तयार आहे म्हणून सांगायला येईल.

**वसंत**०--कायगे, (**इकडे तिकडे पाहून**) मी वाड्याच्या आंतल्या चौकांत आहें; नव्हे काय?

**दासी**--वाड्यांतल्या आंतल्या चौकांत आहां इतकेंच नव्हे ताईसाहेब, 'वाड्यांतल्या सर्व मनुष्यांच्या अगदीं अंतःकरणांत आहां. आपण आतां जाल तेव्हां धूताबाईंना फार दुःख होईल.'

**वसंत**०--खरेंच. अगे, ही रत्नमाला घेऊन धूताबाईंना नेऊन दे आणि सांग कीं, ही या आपल्या दासीला शोभत नाहीं; तर कृपा करून आपण गळ्यांत घालावी. (**"आज्ञा" असें म्हणून ती जाते.**)

( रदनिका रोहसेनाला घेऊन येते )

रद०--बाळा, ही घे, ही घे. कशी छानदार आहे बघ. ती काय मेली सोन्याची, पिंवळी, वाईट! ती नकोगे बाई आमच्या सोन्याला.

रोह०--मी नाहीं जा घ्यायचा तसली मातीची. मला--

**पद.** ( असावरी.--त्रिताल. )

**सोन्याची गाडी दे ॥ धृ० ॥ दे आर्धी करून,**
**मी जाऊन खेळेन, ही टाक मोडून, जा तुला**
**हवी तर घेऊन ॥ १ ॥**

रद०--( सुस्कारा टाकून )

**पद.** [ चाल--नको हरी निशि. ]

**नांव नको तें घेउं तान्हुल्या विटाळ आम्हां सोन्याचा ॥ धृ० ॥**
**हे दिन जाउनि जेव्हां पडतिल पुन्हां धनाच्या राशि घरीं ॥**
**खेळ घेउनी सोन्याची मग, तोंवरि बाळा हीच बरी ॥ १ ॥**

( त्याला वसंतसेनेजवळ घेऊन येते.)

**वसंत**०--रदनिके, आलीस, ये बैस. कोणाचा गे हा मुलगा? अंगावर अलंकार नाहींत, तरी किती सुंदर दिसतो. याच्या मुखचंद्राकडे पाहून मला फार आनंद होतो. खरेंच कोणाचा गे हा?

रद०--हा आमच्या यजमानांचा मुलगा, याचें नांव रोहसेन.

**वसंत**०--असें काय? तरीच [ उठून ] ये बाळा ये [ घेऊन ] बाळा मला पापा दे पाहूं. हा लबाडा; रदनिके, याचा तोंडावळा आणि त्यांचा तोंडावळा अगदीं सारखा दिसतो नाहीं?

रद०--तोंडावळाचसा काय, स्वभावसुद्धां एकसारखा आहे. सध्यां आमचे यजमान त्याच्याकडेच पाहून दिवस लोटताहेत.

**वसंत**०--खरें म्हणतेस! अगे पण हा रडतो कां? बाळा तुला काय पाहिजे?

**पद.** ( चाल--निशा फार जाहली. )

रद०--

**किती सांगूं हो गुण बाळाचे हट्टी मुलखाचा ॥**
**हट्टी मुलखाचा ॥ करावा लाड किती याचा ॥ १ ॥**

खेळत होता एक मुलासह, तो बाई थोराचा ॥
पाहुनि त्याचा मागुं लागला गाडा सोन्याचा ॥ २ ॥
करुनि दिला मग यास तसा हा सुरेख मातीचा ॥
परि ऐकेना छंद कसा तो सोडीना मनिंचा ॥ ३ ॥

—आतां या गुलामाला मी कोठला देऊं बरें ?

**वसंत०**—शिव शिव ! देवा ! ही निर्धनता फार वाईट—

पद, ( चाल—आम्रमंजरी तुला. )

कृतांत पुरुषा असा ॥ होसी निष्ठुर बा तूं कसा ॥ धृ० ॥
कमलदलीं जलबिंदुचि जैसे ॥ भाग्य नराचें चंचल तैसें ॥
खेळसि त्या सरसा ॥ १ ॥ नको रडूं बाळका असा तूं ॥
तुझे सकलही पुरतिल हेतू ॥ राहि उगा पाडसा ॥ २ ॥

**रोह०**—रदनिके, कोण गे ही ?

**वसंत०**—बाळा ही तुझ्या पित्याची गुणांनीं विकत घेतलेली दासी आहे.

**रद०**—अरे, ही तुझी आई होते.

**रोह०**—तूं खोटें बोलतेस; ही नव्हे माझी आई माझी आई म्हणतेस, तर हिच्या अंगावर दागिने गे कुठले.

**वसंत०**—

पद. ( चाल—कंथ बिन रहे कैसी अकेली. )

मनोहर असुनि तुझें मुख फार ॥ धृ० ॥
बाळा बोलुनि शब्द असे, कठिण परी बहु दीन ॥
भेद नको करूं हृदयाचा, होत जिवाला शीण ॥ १ ॥

( अंगावरील दागिने काढून ) ही पहा आतां झालेना मी तुझी आई ! घे हे दागिने, आणि तुला हवी तशी गाडी करवून आण.

**रोह०**—मला नकोत जा.

**वसंत०**—ते कांरे बाळा ?

**रोह०**—कां म्हणजे ? तूं रडतेस म्हणून.

**वसंत०**—( डोळे पुसून ) नाहीं बरें रडत, घे आतां.

( वर्धमानक येतो. )

**वर्ध०**—रदनिके, वसंतसेनाबाईसाहेबांना सांग कीं मागल्या दरवाज्यापाशीं गाडी तयार आहे. लवकर निघायचें करावें.

**रद०**—( **वसंतसेनेजवळ येऊन** ) गाडी तयार आहे. आपल्याकडूनच उशीर आहे.

**वसंत०**—असें काय, तर ही मी उठलें. पण आंतून धूताबाईंना भेटून येईपर्यंत थांब म्हणून सांग त्याला. ( **जाते.** )

**रद०**—( **तसें सांगते व जाते.** )

**वर्ध०**—बरें झालें. मी गाडींतील बैठक आणायला विसरलों होतों तेवढी घेऊन येतों. ( **पुढें पाहून** ) अरे हा कोण जती येत आहे. अपशकुनच समजायचा ! बरें आपण उजव्या बाजूनें जाऊं. ( **जातो.** )

---

## प्रवेश २ रा-मार्ग.

[ **भिक्षु येतो.** ]

**भिक्षु**—हे सर्व लोक अज्ञानांधकारांत केवळ बुडून गेले आहेत—

### पद, ( राग कालंगडा दीप० )

**मूढ हो मनीं उमजा ॥ या जगिं धर्माचि धन समजा ॥ धृ०॥**
**पंचेंद्रिय खल तस्कर यातें ॥ नित्यचि टपती चोरायातें ॥**
**म्हणुनि करा हो ध्यानरवातें । रात्रंदिन न निजा ॥ १ ॥**

—मी या मूढ लोकांचा मार्ग सोडून देऊन कसा चटकन सुखी झालों! तो प्रपंच नको, आणि त्या विवंचनाही नकोत. बरें आतां या उद्यानांत जाऊन एवढी छाटी धुवून घ्यावी. [ **पाहून** ] अरे हा कोण? श्रेष्ठ चारुदत्त वाटतें,हो. आणि तो दुसरा ? त्याचा मित्र मैत्रेय. बरें, ज्यानें आपलें मस्तक चारुदत्ताच्या पायांवर ठेविलें आहे व ज्याच्याजवळ तुटलेली बेडी पडली आहे तो कोण ? [ **न्याहाळून** ] अरे हा गोपाळपुत्र आर्यक असावा.यालाच धरण्याकरितां पालक राजानें नुकतीच दवंडी पिटविली होती. होय तोच हा. याला श्रेष्ठ चारुदत्तानें गुप्तपणें साहाय्य केलें वाटतें. शाबास चारुदत्ता ! तूं खरा

उदार पुरुष आहेस. असो; या वेळीं याच्या दृष्टीस पडणें उचित नाहीं. तर आपण पुढच्या राजशालकाच्या उद्यानांत जावें.

[ जाऊं लागतो व चालतां चालतां ]

पद [ चाल—कैसा जोग कमाया बे ]

तो नर दुःखमुक्त झाला ॥ तयाच्या करीं स्वर्ग आला ॥ धृ० ॥
ज्यानें जिंकुनि पंचेंद्रियगण, मोहनाशही केला ॥ अहंकार चांडाळ जयानें नष्टदशेला नेला ॥ १ ॥

-अरे हेंच तें उद्यान–[ आंत जातां जातां ]-

पद [ चाल–जातों पंढरिला पंढरिला ]

आधीं मन मुंडा ॥ व्यर्थ मुंडितां मुंडा ॥ धृ० ॥
मुंड मुंडिलें; तुंड मुंडिलें; परंतु ज्यानें लोभें ॥
नाहिं मुंडिलें; चित्त आपुलें; काय तयाला लाभे ॥१॥

[ पडद्यांत शब्द होतो. ]

" कोण आहेरे तो ? गोसावडा रे गोसावडा ! अरे दुष्टा गोसावड्या, उभा रहा. थांब. "

**भिक्षु**—अरे, हा राजशालक संस्थानक मला धरतो कीं काय कोण जाणें. एका भिक्षूनें याचा अपमान केला होता, म्हणून जो भिक्षु भेटेल त्याच्या नाकांत वेसण घालून हा त्याला हिंडवितो. मी तर निराश्रित आहे, शरण कुणाला जाऊं ? आतां बुद्धा, तूंच माझें रक्षण कर.

[ शकार व विट येतात. ]

**शका०**—अरे दुष्टा गोसावड्या, थांब, उभा रहा. मद्यप्राशनसमयीं खाण्याकरितां जसा तांबड्या मुळ्याचा बुडखा तोडतात तसा तुझा मी गळा तोडतों बघ. [ त्याला मारूं लागतो. ]

**विट**–अरे काणेलीपुत्रा, प्रपंचाला त्रासून ज्यानें भगवीं वस्त्रें धारण केलीं त्याला ताडण करणें बरोबर नाहीं. दे सोडून त्याला. हा पहा या बागेंत काय चमत्कार आहे तो—

## साकी.

शरणप्रद हे तरू अनाथा सौख्यद वडिलांसम कीं ॥
नगरा सोडुनि वनीं उभे तरि उपकारक हे लोकीं ॥
सत्याचि जाणावें ॥ यांना साधुचि मानावें ॥ १ ॥

**भिक्षु**—हे उपासका, माझ्यावर कृपा कर.

**शका०**—पहारे विटा, हा गोसावडा माझी निंदा करितो.

**विट**—काय म्हणतो तो ?

**शका०**—मला उपासक म्हणतो, तर मी काय न्हावी आहे वाटतें ?

**विट**—अरे हा तुझी स्तुति करितो-निंदा नव्हे ही.

**शका०**—मग चिंता नाहीं. अरे श्रमणका, ऐक.

**भिक्षु**—तूं धन्य आहेस, तूं पुण्य आहेस.

**शका०**—पहारे विटा, हा गोसावडा 'तूं मला धन्य आहेस,' 'तूं पुण्य आहेस' असें म्हणतो. तर मी काय श्रावक आहे का कोष्टी आहे ?

**विट**—मित्रा, ही सुद्धां स्तुतीच-निंदा नव्हे.

**शका०**—खरोखर निंदा नव्हेना ? स्तुती करूं दे हवी तेवढी. स्तुतीला मी पात्रच आहे. पण हा येथें कशाला आला आहे ?

**भिक्षु**—मी आपली छाटी धुण्याकरितां येथें आलों आहे.

**शका०**—अरे दुष्टा श्रमणका, सर्व उद्यानामध्यें श्रेष्ठ असें हें पुष्पकरंडक नामक जीर्णोद्यान माझ्या मेव्हण्यानें मला दिलें आहे. ज्यांत कोल्हींकुत्रीं खुशाल पाणी पितात, पण मी वरपुरुष ज्यांत कधीं स्नान सुद्धां करीत नाहीं, त्या पुष्करणींत तूं हीं आपलीं कुळिथाच्या पाण्यांत बुडविल्यासारखीं, ओंगळ घाणेरडीं भगवीं लकतरें धुतोस काय ? तर तुला आणखी मारतों.

**विट**—मला वाटतें हा नवा संन्यासी आहे. घटलेला नाहीं.

**भिक्षु**—उपासका, तुझा तर्क खरा आहे; मी नुकताच संन्याशी झालों.

**शका०**—तूं जन्मापासूनच कां रे संन्यासी नाहीं झालास ? अरे चोरा ! ( मारतो. )

**भिक्षु**—( मार सोसून ) नमो बुद्धाय, नमो बुद्धाय !

**विट**—या गरिबाला मारून तुला काय लाभ होणार आहे ?

**शका०**—अरे गोसावड्या, मी विचार करतों तोंपर्यंत उभा रहा.

**विट**—विचार कोणाबरोबर करतोस ?

**शका०**—आपल्या मनाबरोबर.

**विट**—बरें कर. [ **मनांत** ] हा संन्यासी, अजून पळून जात नाहीं, तेव्हा हा मूर्ख आहे !

**शका०**—( **आपल्याशीं** ) हे पुत्रका मना, या संन्याशानें जावें कीं रहावें ? किंवा जाऊं नये आणि राहूंही नये ? ( **विटास** ) हां, केला मीं विचार. माझें शहाणें मन मला हळूंच सांगतें कीं, यानें जाऊं नये, राहूं नये, उच्छ्वास टाकूं नये, निःश्वास टाकूं नये, येथेंच पडून लवकर मरावें.

**भिक्षु०**—नमो बुद्धाय; मी शरण आहें.

**विट**—जाऊं दे त्याला.

**शका०**—बरें जायचें तर कांहीं संकेतानें जावें.

**विट**—कोणता संकेत ?

**शका०**–संकेत हाच कीं, यानें पाण्यांत चिखल टाकावा, पण पाणी गढूळ होऊं नये. हें त्याला कठीण वाटत असेल तर पाण्याचा ढीग करून त्यावर चिखलाचा गोळा ठेवावा आणि मग जावें.

**विट**--( **मनाशीं** ) काय मूर्खपणा हा !

## साकी.

**दुश्चरिताश्रय खरे चालते पुत्रचि पाषाणाचे ॥ मानुष्याला लाजविणारे वृक्षाचि कीं मांसाचे ॥ ऐसे मूर्खशिरोमणि असती ॥ जन्मा आले भूवरतीं ॥ भारचि होती ॥ जननिस कष्टविती ॥ १ ॥**

**भिक्षु०**–( **शकारास शाप देतो.** )

**शका०**–मित्रा विटा, हा काय म्हणतोरे ?

**विट**–हा तुझी मोठी स्तुति करितो.

**शका०**–स्तुतीच करतोना ? मग चिंता नाहीं. जारे, जा आतां.

**भिक्षु०**–( **चरफडत निघून जातो.** )

**शका०**–विटा, हा पहारे पुनः—

**विट** – जाऊं देरे ! हे वृक्ष पहा आपल्या लतारूप स्त्रियाबरोबर कसे आनंदानें डुलत आहेत.

**शका०**—खरेंरे खरें, आणि हे वानर पहा कसे फणसासारखे लोंबताहेत !

**विट**—मित्रा, या सुंदर शिलातलावर बैस तरी.

**शका०** –हा पहा मी बसलों; तूं पण बैस. ( **बसतात.** ) मित्रा, अजून पहा त्या वसंतसेनेची मला वारंवार आठवण होते.

**विट**–( **आपल्याशीं** ) तिनें याची इतकी निर्भर्त्सना केली तरी हा तिचेंच चिंतन करितो. अथवा हेंही योग्यच आहे, कारण–

## अंजनीगीत.

**स्त्री जरि अवमानी नचाला ॥ कामज्वर ये अधिकचि त्याला ॥**
**सुजनीं पावे परि शमनाला ॥ नष्टचि वा होई ॥ १ ॥**

**शका०**–कायरे विटा, लवकर ये म्हणून स्थावरक चेटाला सांगितलें असून अजून कां बरें आला नाहीं ? मला तर भूक फार लागली आहे. पायांनीं जाववत नाहीं. हा सूर्य पहा एकाद्या चिडलेल्या तांबड्या तोंडाच्या माकडासारखा दिसतो आहे. अगदीं पाहवत नाहीं याच्याकडे.

**विट**–तसेच तें पहा तिकडे–

### पद. ( चाल—बाळा जो जो रे. )

**चारा सोडुनिया, गोकुल हें तरुतालिं बसलें पाहें ॥ धृ० ॥**
**तृषितचि मृगपांक्ति बघ पीती, रविकरतप्तजलें तीं ॥**
**तपनाची भीती, बहु चित्तीं, मार्गीं कोणि न फिरती ॥**
**यास्तव वाहन तें मज वाटे, येतां मार्गीं राहे ॥ १ ॥**

**शका०**–पण स्थावरक चेट अजून कां येत नाहींरे ? बरें तो येई-पर्यंत मी थोडेसें छानदार गातों. गाऊं ना ? ( **गाऊन** ) मित्रा, कसा गायलों रे मी ?

**विट**–तें काय विचारावें ? आपण केवळ गंधर्वच आहा.

**शका०**–अरे मी गंधर्व कसा नसेन ? पहा,––

## ओंवी.

हिंगू जीरक भद्रमुस्ता । सगुडा शुंठी वचा सुहिता ॥
ती म्यां सेविली गंधयुक्ता । गंधर्व मग मी कसा नव्हे ॥

—इतकेंच करून नाहीं गायला येत ! आणखी काय केलें सांगू कां ?

हिंग मिऱ्याचा लावुनि सुवास ॥ घृतपाचित करुनि त्यास ॥
भक्षिलें म्यां कोकिलांचें मांस । कोकिळस्वर मी कसा नव्हे ॥ २ ॥

—अरे पण तो चेट कां येत नाहीं ?

**विट**—आतां लवकरच येईल.

( गाडीचा आवाज होतो. चेट व वसंतसेना येतात. )

**चेट**—माझ्या पोटांत धाक पडला आहे, दिवस वर डोईवर आला, आतां धनी काय म्हणतील कोण जाणें, झ्यां झ्या, बाळ्या बाळ्या !

**वसंत०**—अगे बाई, हा वर्धमानकाचा शब्द नव्हे ! चारुदत्तानें दुसरा गाडीवान पाठविला कीं काय कोण जाणें [ **दुश्चिन्ह झालेसें दाखवून** ] देवा ! —

**पद.** ( चाल—मना तळमळसी. )

शून्य कां भासे, चहुंकडे शून्य कां भासे ॥ कांपतें हृदय कां असें गति न भलि दिसे ॥ धृ० ॥ स्फुरतो कां हा नयन कळेना ॥ भीति मनींची केंवि गळेना ॥ अवयें विपरीत असे ॥ १ ॥

**शका०**—मित्रा, विटा गाडी आलीसें वाटतें.

**विट**—कशावरून तुला समजलें ?

**शका०**—हा पहा म्हाताऱ्या डुकरासारखा चाकांचा घरघर शब्द होत आहे. [ **चेट येतो त्यास पाहून** ] पुत्रका, स्थावरका, चेटा आलास ? बरें झालें.

**चेट**—आलों महाराज.

**शका०**—गाडी आली ?

**चेट**—आली महाराज.

शका०—बैल आले ?

चेट—आले धनीसाहेब.

शका०—बरे तूंही आलास ?

चेट—हा मी महाराज आपल्यापुढेंच उभा आहें.

शका०—बरें तर आण गाडी आंत.

चेट—कोणत्या वाटेनें आणूं ?

शका०—ह्या पडक्या भिंताडावरून आण.

चेट—त्या वाटेनें आणली तर गाडी मोडेल, बैल मरतील, आणि मीही मरेन महाराज.

शका०—बरें मग, मी राजाचा मेव्हणा आहें, मला काय कमी आहे ? गाडी मोडली तर दुसरी करीन; बैल मेले तर दुसरे घेईन आणि तूं मेलास, तर दुसरा गाडीवान ठेवीन.

चेट महाराज, तुमचें सगळें ठीक आहे, पण मी गरीब विनाकारण प्राणाला मुकेन त्याचें काय ?

शका०—कांहीं चिंता नाहीं; त्या पडक्या भिंताडावरूनच गाडी आणली पाहिजे, बस्स.

चेट—पण महाराज——

शका०—बस्स, बोलूं नकोस, लवकर आण.

चेट—बरें महाराज, चलारे बाबांनो. [ **संभाळून आणून** ] ही आली महाराज गाडी.

शका०—कायरे रांडलेका, तूं मेला नाहींस आणि बैलही मेले नाहींत ?

चेट—आपल्या पायांच्या पुण्याईनें वांचलों महाराज.

शका०—मित्रा, चल आपण गाडींत बसूं. तूं माझा गुरु, तूं माझा शिक्षक, तूं माझा मित्र, म्हणून तूंच आधीं बैस.

**विट**—बरें, मी बसतों. [ **बसूं लागतो.** ]

शका०—अरे थांब थांब; ही गाडी तुझी म्हणून तूं आधीं बसतोस वाटतें ? गाडीचा धनी मी आहें. तेव्हां मी बसणार आधीं. चल हो बाजूला.

**विट**—आपणच मला बैस म्हणून सांगितलें, आणि आतां आपणच असें म्हणतां ?

**शका०**—मीं तसें म्हटलें म्हणून? 'महाराज, आपणच आधीं बसावें' असें म्हणावें कीं नाहीं तूं?

**विट**—बरें, आपण बसा आधीं.

**शका०**—हां फिरीवरे गाडी.

**चेट**—( **गाडी फिरवून** ) चढावें महाराज.

**शका०**—[ **गाडीजवळ जाऊन पाहून, भिऊन, विटाच्या गळ्याला मिठी मारतो.** ] अरे मी मेलोंरे मेलों! गाडींत कोणी राक्षसी बसली आहे, किंवा कोणी चोर बसला आहे. राक्षसी असली तर आम्हांला चोरून नेईल, आणि चोर असला तर खाऊन टाकील! आतां कसें करावें बरें?

**विट**—मित्रा, भिऊं नकोस. दुपारच्या उन्हानें तुझी दृष्टि दिपली म्हणून तुला तसें दिसतें. चेटाची सावली असेल ती.

**शका०**—थुत्रका चेटा, जिवंत आहेसना बाबा!

**चेट**—होय महाराज.

**शका०**—मित्रा, गाडींत कोणी स्त्री बसली आहे. तूं बघ बरें.

**विट**—चल पाहूं.

**वसंत०**—( **विस्मय पावून** ) अरे प्रारब्धा! हा माझ्या नेत्रांना त्रास देणारा राजशालक आला! आतां माझे प्राण राहतात कीं नाहीं कोण जाणें. माझें येथें येणें निष्फळ झालेंसें वाटतें.

**विट**—( **वसंतसेनेस पाहून आपल्यापाशीं** ) अरे अरे! फार वाईट गोष्ट झाली!—

**पद.** ( चाल लावणीची. )

**वसंतसेना हरिणीसम या व्याघ्रकरीं सांपडली ॥**
**वाटे दुर्दैवें ही अबला मृत्युमुखांताचि दिधली ॥ १ ॥**
**चंद्रधवल जो मृदुपुलिनावरि करि आनंदें केली ॥**
**त्या हंसा सोडुनि ही हंसी काका कां अनुसरली ॥ २ ॥**

—वसंतसेने काय केलेंस हें?

**नेत पूर्वी आर्जवूनि तुज अवगणना कां केली ॥**
**परि धनलोभें आलिस आतां बुद्धि कशी गे चळली ॥ ३ ॥**

**वसंत०**—नाहीं नाहीं, मी त्याच्यावर अनुरक्त होऊन आलें असें नाहीं. गाडीची अदलाबदल झाल्यामुळें चुकून इकडे आलें आहें. मी तुला शरण आहें, आतां तूंच माझें रक्षण कर.

**विट**-- भिऊं नकोस. ( **मनांत** ) येथें आतां ठकविद्या लढविली पाहिजे. [ **शकाराजवळ येऊन** ] खरेंच रे मित्रा, गाडींत कोणी राक्षसी बसली आहे.

**शका०**—राक्षसी आहे म्हणतोस, मग तिनें तुला कसें रे नाहीं खाल्लें ?

**विट**—अशी भलतीच कल्पना करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तर चल आपण या दाट झाडीच्या सावलींतून चालत जाऊं.

**शका०**--चालत गेल्यानें काय होईल ?

**विट**—असें केल्यानें आपल्याला व्यायाम होईल, आणि बैलांना विसांवा सांपडेल.

**शका०**—बरें तर तसेंच करूं, येथें काय ! चेटा, गाडी घेऊन जा, आम्हीं पायांनींच येतो–पण नाहीं नाहीं, गाडींतच बसून गेलें पाहिजे, कारण मी गाडींत बसून चाललों म्हणजे लोक म्हणतील कीं ही राजशालक संस्थानकांची स्वारी आली आहे.

**विट**—[ **मनांत** ] आतां कोणता उपाय करावा बरें ? विषाचें अमृत करावयाचें म्हणजे मोठें कठिण. असो, आता काय होईल तें होवो. खरें सांगावें हें बरें. [ **उघड** ] मित्रा, गाडींत राक्षसी आहे म्हणून जें सांगितलें तें थट्टेनें सांगितलें, ही वसंतसेना गाडींत बसून तुझ्याशीं रमण्याकरितां आली आहे.

**वसंत०**—इडापिडा टळो, अमंगळ पळो; हा काय भलतेंच बोलला हें !

**शका०**–[ **आनंदानें** ] हां ! मी वरपुरुष, मनुष्यवासुदेव, म्हणून मला भेटण्याकरितां आली होय ? मित्रा, मीं तिला पूर्वी कोप आणला होता; पण तिला आतां सुप्रसन्न करतों बरें कां.

**विट**—बरें कर.

**शका०**--हा मी तिच्या पायां पडतों. [ **जवळ जाऊन** ] हे अंबिके, देवी, मी तुझा दास विनंती करितों, ऐक. सुंदरी, मी तुझ्या पायांवर मस्तक

ठेवितों, तुला हात जोडतों, मी पूर्वी केलेल्या अपराधांची तूं मला क्षमा कर. ( पायां पडूं लागतो. )

**वसंत॰**— चल, दूर हो मूर्खा, काय बोलतोस हें ! ( पायानें लोटून देते. )

**शका॰**—( क्रोधानें ) कायगे दाडगे ?—

**श्लोक.**

जें अंबांनीं प्रीतिनें चुंबियेलें ॥ देवालाही जें नसे नम्र झालें ॥ तें पायांनीं ताडिलें उत्तमांग ॥ जैसें रानीं दु:शृगालें मृगांग ॥ १ ॥

—कायरे चेटा, ही तुला कोठें सांपडली.

**चेट**—माझा तर्क असा वाहतो कीं, गांवांतल्या ओझ्याच्या गाड्यांनीं जेव्हां रस्त्यांत दाटी झाली तेव्हां चारुदत्ताच्या बागेच्या दाराजवळ मीं आपली गाडी अम्मळ उभी केली होती. तेव्हां ही बाई आपलीच गाडी समजून आंत केव्हां बसली हें कांहीं मला समजलें नाहीं. मी तसाच गाडी घेऊन आलों.

**शका॰**—तर मग गाडीची अदलाबदल झाल्यामुळें ही इकडे आली; माझ्याशीं रमण्याकरितां कांहीं आली नाहीं ! अगे हे गर्भदासी, उतर उतर माझ्या गाडींतून. त्या भिकारड्या चारुदत्ताला अनुरक्त होऊन माझे बैल खराब करतेस काय ?

**वसंत॰**—( मनाशीं ) चारुदत्ताला अनुरक्त झाले हे ह्याच्या तोंडचे शब्द माझ्या कानाला फार गोड लागले. आतां पुढें काय होईल तें होवो.

**शका॰**—उतरतेस, कीं वेणी धरून ओढूं खालीं ?

**विट**—छे छे ! मित्रा असें करूं नकोस, मी तिला उतरवितों. ( जवळ जाऊन ) वसंतसेने, उतर बरें.

**वसंत॰**—( उतरून ) आतां काय गति होईल कोण जाणे !

**शका॰**—( आपल्याशीं ) मागें हिनें माझा अपमान केला होता, त्यामुळें जो कोपाग्नि धुमसत होता तो आज हिच्या लाथेनें पेटला आहे. तर हिला ठार मारल्यावांचून कांहीं तो शांत होणार नाहीं. ( उघड ) अरे विटा—

## श्लोक.

जरी इच्छिसी लांब आणि विशाला ॥
गुलानार बारीक ऐसी दुशाला ॥
जरी पाहिजे मांसही खावयाला ॥
कुचूकूचु कुच्चु कुचू चावयाला ॥ १ ॥

विट—तर काय म्हणतोस ?

शका०—माझें एक काम कर.

विट—करीन पण अकार्य नाहीं करणार.

शका०—अरे अकार्य तर नाहींच, आणि त्या राक्षसीचेंही भय नाहीं.

विट—तर मग सांग काय ते.

शका०—दुसरें कांहीं नाहीं, वसंतसेनेला मारून टाक.

विट—शिव शिव ! काय बोलतोस हें--

## पद. ( चाल—असतें जरि तें अन्य रत्न बाला. )

अबला स्त्री ही केवल बाला, भूषण नगरीचें ॥
वेश्या परि कुलयोषिसम आचरण लीनतेचें ॥
लवहि हिचा अपराध नसोनी वधिन जरी मी अंगें ॥
परलोकनदी तरुनि जावया नाव कोणती सांगें ॥ १ ॥

शका०--अरे ती नाव मी देईन तुला; आणि हें बघ, या बागेच्या एका कोंपऱ्यांत जर तिला मारून टाकलीस, तर तुला कोण पहायाला आलें आहे ? मित्रच आहेस तूं !

विट—कोणी मनुष्य पाहत नसलें तरी दुसरे आहेत—

## साकी.

दाहि दिशा वनदेवी हिमकर दीप्तकिरण भास्कर कीं ॥
मारुत आत्मा गगन तसें हें; दुष्कृत सत्कृत लोकीं ॥
असतां साक्षी हे ॥ दुष्कर्मीं नच कर वाहे ॥ १ ॥

शका०--अरे हिच्या अंगावर वस्त्राचें झांकण घालून मार.

विट—महा अधम आहेस तूं !

**शका०**—[ **मनांत** ] हा म्हातारडा कोल्हा अधर्मभीरु आहे, तर आतां चेटाला अनुकूल करून घ्यावें. [ **उघड** ] पुत्रका चेटा, मी तुला सोन्याचीं कडीं देईन.

**चेट**—तुम्हीं दिलीं तर मी हातांत घालीन.

**शका०**--तुझी बैठक किनखापाची करीन.

**चेट**—मग मी त्यावर बसेन.

**शका०**--तुला सर्व चेटांचा नाईक करीन.

**चेट**—मग मी त्यांचा धनी होईन.

**शका०**—तर मग मी सांगतों तसें कर.

**चेट**—महाराज, वाईट काम सोडून पाहिजे तें सांगा, मी करीन.

**शका०**—वाईट तर नाहींच नाहीं.

**चेट**—तर मग सांगा.

**शका०**—दुसरें कांहीं नाहीं, या वसंतसेनेला मारून टाक.

**चेट**—कृपा करा महाराज! गाडीची अदलाबदल झाल्यामुळें ही बिचारी चुकून येथें आली, तर तिला मी मारणार नाहीं.

**शका०**—तूं माझें ऐकत नाहींस? बरं संभाळ! [ **त्याला लाथा-बुक्क्यांनीं मारूं लागतो.** ]

**चेट**—तुम्ही मला मारा, काय पाहिजे तें करा, पण ही गोष्ट मी करणार नाहीं. मागच्या जन्मीं काय पाप केलें होतें म्हणून या जन्मीं तुमची चाकरी करून पोट भरतों, तेव्हां या जन्मीं पाप करून पुढची तयारी करून ठेवीत नाहीं.

**वसंत०**—मी शरण आहें, माझें रक्षण कर.

**विट**—मित्रा, त्या गरिबाला कां मारतोस? [ **मनांत** ] हा चाकर असून याची योग्यता केवढी आहे! शाबास! एकूण दैव विचित्र खरें. हा बिचारा सद्गुणी असून चाकर झाला, आणि हा महानीच नरपशु धनी झाला!

**शका०**—( **मनांत** ) हे दोघेही मित्रे आहेत. यांच्या हातून हें काम होण्यासारखें नाहीं. स्वतः या राजशालकानेंच कंबर बांधली पाहिजे. मला

कोणाचीच भीति नाहीं. ( **उघड** ) चेटा, तूं जा येथून. वसंतसेने, तूं त्या सावलींत बैस जा.

**चेट**--( **वसंतसेनेजवळ येऊन** ) बाई, माझें सामर्थ्य, माझें पुण्य, काय तें इतकेंच. ( **जातो.** )

**शका०**—वसंतसेने, चल ये आतां इकडे, मी तुला मारणार आहें.

**विट**--मूर्खा, चल हो एकीकडे. माझ्यासमक्ष तूं हिला मारशील काय ? [ **जोरानें ढकलून देतो.** ]

**शका०**—[ **उठतां उठतां** ] अरे विटा, मी प्रत्यक्ष राजशालक ! तुला आजपर्यंत हवें तें खायला घातलें, तूपसाखरेचा रतीब लाविला, आणि आज तुला काम सांगितलें म्हणून मला मारतोस काय ? [ **मनाशीं विचार करीत** ] हां ! आतां मला युक्ति सुचली. ह्या कोल्ह्यानें मान हालवून त्या चेटाला कांहीं खूण केली आहे. तर याला दुसरीकडे पाठवून द्यावें आणि मग वसंतसेनेला मारून टाकावें. [ **उघड** ] विटा, वसंतसेनेला मारून टाक असें जें म्हटलें तें खरें नव्हे; अरे थट्टा ती ! पत्रावळीयेवढ्या विस्तीर्ण कुळांत माझा अवतार असून मी असें हलकें काम करीन ? तिनें भय पावून मला वश व्हावें म्हणून मी तें ढोंग केलें.

**विट**--तर मग आतां म्हणतोस काय ?

**शका०**--तूं जवळ आहेस म्हणून ही लाजते, मला वश होत नाहीं. यासाठीं तूं जा, आणि मी मारलें म्हणून तो तो चेट पळून जात आहे त्याला धरून आण.

**विट**--( **आपल्याशी** ) असें मुद्दां असेल, कारण एकांताशिवाय मन्मथ संचरत नाहीं. [ **उघड** ] बरें तर, मित्रा, मी जातों.

**वसंत०**-मी शरण आलें असून मला सोडून कसे चाललां ?

**विट**—तूं अगदीं भिऊं नकोस, स्वस्थ ऐस. मित्रा, ही वसंतसेना माझी ठेव तुझ्यापाशीं असूं दे, मी आल्यावर मला परत दे.

**शका०**—त्याला कांहीं चिंता नाहीं. ठेवीप्रमाणें हिला अगदीं सुरक्षित ठेवतों, म्हणजे झालेंना ?

**विट**—खरेंना ?

**शका०**—अगदीं खरें, मी खोटें सांगेन कसें ?

**विट**—बरें; ( **कांहींसा दूर जाऊन** ) अथवा मी गेलों तर हा घातकी तिचा वध करील. यासाठीं येथें आड उभें राहून याचा बेत काय आहे तो पाहूं. ( **तसें करितो** )

**शका०**—ठीक झालें, आतां हिला मारून टाकावें ! अथवा तो विट महाठक आहे. कोठें तरी आड उभा राहून कोल्ह्याप्रमाणें कपट करीत असेल, तर त्यालाही फसविण्याची युक्ति काढली पाहिजे.—

( **कांहीं फुलें कानांत व मंदिलांत खोंचून हंसत हंसत** )

—हे प्रिये सुंदरी, वसंतसेने, ये, ये.

**विट**—आतां हा कामातुर झाला खरा. आपण जावें. ( **जातो** ).

**शका०**—[ **आर्जव करून** ] हे सुंदरी, हें काय बरें ?—

## ओंव्या.

**देत असतां बहु कांचन ॥ बोलत असतां प्रिय वचन ॥**
**नम्र करितां सवेष्टन ॥ हा मस्तक तुजपुढें ॥ १ ॥**
**तथापि तूं मजला सुदती ॥ इच्छीत नाहींस गजगती ॥**
**सेवा करिती तयाप्रती ॥ कष्टविती काय मनुष्यें ॥ २ ॥**

**वसंत०**—हा अधमा ! चांडाळा ! काय बोलतोस हें—

## पद. ( चाल—थाटमाट सदानिं नवा. )

**दाउनि धनलोभ मला व्यर्थ भुलविशी ॥ प्राप्त होय शुद्ध काय काय हा तुशीं ॥ धृ० ॥ पाहुनि कुलशील नरा आह्मि सेवितों॥ त्या संगें सकल काम पूर्ण मानितों ॥ सेवुनियां भ्रमरि खला आम्रविटप तो ॥ आदरि मग नीच पलश सांग ती कशी ॥ १ ॥**

**शका०**—अगे बटकीचे पोरी, त्या भिकारड्या चारुदत्ताला आम्रवृक्ष आणि मला पलश म्हणतेस काय ? अशा रीतीनें मला शिव्या देतेस काय ?

**वसंत०**—तो निरंतर माझ्या हृदयांत वास करीत आहे; तर त्याचें स्मरण करूं नको तर कोणाचें करूं ?

**शका०**—अजून तो तुझ्या हृदयांत आहे का ? तर त्याला आणि तुला

एकदमच मोक्ष देतों. त्या भिकारड्या चारुदत्तावर अनुरक्त झालीस नाहीं का ? रहा अशी.

**वसंत०**—तींच अक्षरें पुनः म्हण; तीं माझ्या कानाला फार गोड लागतात.

**शका०**—तोच दासीपुत्र चारुदत्त तुझें रक्षण करो.

**वसंत०**—तो येथें असता तर माझें रक्षण झालेंच असतें.

**शका०**—तो असता तर रक्षण करता काय ? करूं दे तर. हा पहा मी तुला मारून टाकतों. कसें रक्षण करतों तें पाहतों. तो भिकारी रक्षण करतो म्हणे.

**वसंत०**—[ **भिऊन** ] अग आई, तूं कोठें आहेस ? हे प्राणप्रिया चारुदत्ता, मनोरथ पूर्ण न होतां आज माझे प्राण जाणार ना ? आतां मी काय करूं ? मोठ्यानें तरी ओरडूं कां ? छे ग बाई, तेंही नीट दिसत नाहीं. कारण वसंतसेना मोठ्यानें ओरडते असें लोक म्हणतील. चारुदत्ता, हा मी तुला शेवटचा प्रणाम करितें.

**शका०**—पुनः त्याचें नांव घेतेस ? ( **हातांनीं गळा दाबून** ) आतां कर त्या भिकाऱ्याचें स्मरण.

**वसंत०**—आर्या चारुदत्ता !

**शका०**—मर, मर, मर आतां. ( **आनंदानें** ) पहा आतां माझ्या बाहूंचें शौर्य कसें आहे तें ! ( **मारतो व मेली असें समजून दूर होतो** ) माझें मन तुझ्यावर बसलें असून तुझें माझ्यावर नाहीं म्हणून मीं तुला मारलें. आजचें माझें हें शौर्य पाहून माझ्या वाडवडिलांना फार आनंद होईल. ओ हो ! तो कोल्हा येत आहे; तर आतां दूर व्हावें .

( **विट व चेट येतात.** )

**विट**—हा तर पाय पसरून वाटेंत बसला आहे, तेव्हा यानें स्त्रीवध केला ग्वचित. ईश्वर आतां कल्याण करो ! ( **येऊन** ) मित्रा, तूं सांगितल्याप्रमाणें चेटाला समजावून आणलें.

**शका०**—विटा, आलास बरें झालें. चेटा, तूंहि आलास ?

**चेट**—होय महाराज.

**विट**—माझी ठेव मला परत दे.

**शका०**—कोणती ठेव ?



शकार०— ......शेला...... ओळखतील तर हिला वाळलेल्या पानांनीं झांकून ठेवतों. (पृ. ८१)

विट—वसंतसेना.

शका०—अरे ती गेली.

विट—कोठें ?

शका०—[ तर्क करून ] अशी या दिशेनें गेली. बरें, पण तूं कोणत्या दिशेनें आलास ?

विट— मी पूर्व दिशेनें आलों.

शका०—हां, तर ती दक्षिण दिशेनें गेली.

विट— मी दक्षिण दिशेनें आलों.

शका०—तर मग ती उत्तर दिशेनें गेली.

विट—अरे असें संदिग्ध कां बोलतोस, नीट सांग काय तें.

शका०—खरें सांगूं ? मारली !

विट—अजून मला खरें वाटत नाहीं.

शका०—तुझ्या गळ्याची शपथ, मीं मारली !

विट—( खेदानें ) खरेंच कारे मारलीस ?

शका०—तुझी खात्री होत नसेल तर हें पहा या राजशालक संस्थानकाचें शस्त्र ! ( दाखवितो. )

विट—शिव शिव ! मी पापी काय पाहातों हें ! ( मूर्छित पडतो. )

शका०—अरेरे ! माझा मित्र शांत झाला !

चेट—विटा, सावध हो. विचार न करितां मीं हिला आणलें तेव्हां मींच हिला मारलें.

विट-( सावध होऊन ) वसंतसेने ! तुझा असा परिणाम व्हावा काय ?-

## पद. [ बागेश्री–त्रिताल. ]

विलासिनी ही गेली ॥ मूर्ति रतीची काय निमाली ॥ धृ ०॥
सरिता कीं औदार्यजलाची ॥ होती भूषा सुभूषणांची ॥
चारुमुखी खनि सौंदर्याची ॥ विक्रयभूमिच सुरतरसाची ॥
काळमुखीं कशी दैवा पडली ॥ १ ॥

—हा दुष्टा ! या नगरीचें सौंदर्य नष्ट केलेंस, यांत तुला काय मिळालें ? ( मनांत ) कदाचित् हा अधम आपलें दुष्कर्म माझ्यावर घालील; तर येथून जावें हें बरें. ( उघड ) नीचा, पुरे तुझी संगत. जातों मी.

शका०—( हात धरून ) अरे जातोस कोठें ?

विट—सोड माझा हात.

शका०—अरे, वसंतसेनेला मारून मला दोष लावून पळून जातोस काय आतां ? सांप्रत मी अनाथ आहें असें तुला वाटलें वाटतें ?

विट—तूं महा अधम आहेस.

शका०—अरे मित्रा असें काय बरें ? मी तुला शंभर मोहोरा देतों, गळ्यात घालायला एक छानदार कंठी देतों; पण हा आरोप माझ्यावर न येतां दुसऱ्या कोणावर जाईल असें कर.

विट—चल मूर्खा !

शका०—( ही ही करून हंसतो ) मित्रा, विटा, चल आपण तळ्यांत जाऊन क्रीडा करूं.

विट—सोड मला—

## साकी.

स्नेह नको मज तुझा क्षणभरी होवो रोष बरा तो ॥
अपतित असतां पतितासंगें दोष नराला येतो ॥
त्यजिलें मीं तुजला ॥ जैसें विगुणा धनुपाला ॥ १ ॥

( जाऊं लागतो. )

शका०—[ ओरडून ] अरे, माझ्या पुष्पकरंडक जीर्णोद्यानात वसंतसेनेला मारून पळून जातोस काय ? थांब, माझ्या मेव्हण्यापुढें तुझ्यावर फिर्याद करितों.

विट—आं, काय ? फिर्याद करतोस ? ( तरवार उपसतो ).

शका०—( भिऊन मागें सरून ) अरे, भ्यालास होय ? तर जा जा.

( विट जातो. )

शका०—गेला, पीडा टळली. पुत्रका चेटा, मी आज कसें नामी काम केलें !

चेट—फार वाईट काम केलेंत महाराज.

**शका०**—काय वाईट काम केलें म्हणतोस ? बरें, झालें तें झालें. आतां काय त्याचें ? ही घे कंठी तुला.

**चेट**- नको मला. ती तुम्हालाच शोभते.

**शका०**—बरें राहिलें. तू गाडी घेऊन जा आणि माझ्या वाड्यासमोर चोळांत उभा रहा, मी इतक्यांत येतो.

**चेट**—जी महाराज. ( **जातो.** )

**शका०**—विट गेला तो नाहींसा झालाच. आतां चेटाला वाड्यासमोरच्या गल्लींत उभें रहावयास सांगितलें आहे, त्याला बिडी घालून अडकावून टाकावें. असो; ती मेली किंवा नाहीं तें पाहावें [ **पाहून** ] ही खचित मेली. आतां हिला शेल्यानें झांकून ठेवितों. पण नको; लोक हा शेला कोणाचा हें ओळखतील. तर हिला या वाळलेल्या पानांनीं झांकून ठेवितों. [ **तसें करून** ] आतां राजसभेंत जाऊन, धनलोभास्तव चारुदत्तानें वसंतसेनेस माझ्या पुष्पकरंडक जर्णोद्यानांत ठार मारिलें अशी फिर्याद करितों. ही युक्ति फार चांगली आहे. [ **पुढें पाहून** ] अरे, पण मी ज्या वाटेनें जाणार त्याच वाटेनें हा गोसावडा येत आहे. हा वसंतसेनेला मीं मारलें म्हणून सांगेल, तर आपण या पडक्या भिंताडावरून जावें. [ **जातो.** ]

( संवाहक भिक्षु येतो. )

**भिक्षु०**—ही आपली छाटी तळ्यांत धुतली. आता झाडाच्या खांदीवर घालून वाळवितों. पण येथें वानरांचा उपद्रव फार आहे. तेव्हां ती धुरळ्यांत पडली तर मातीनें भरेल. तर आतां हीं वाळलेलीं पानें पडलीं आहेत त्यांवर घालून वाळवावीं. [ **तसें करून खालीं बसून** ] उगीच काय बसावें ? धर्माक्षरांचा तरी पाठ करावा.

**जो जिंकुनि पांचजणांसी ॥ टाकी मारुनिया ममतेसी ॥ धृ० ॥**
**नाशि अहंता जो यत्नानें ॥ स्वर्ग लाभे निश्चित त्यासी ॥ १ ॥**

—अथवा जोपर्यंत बुद्धोपासिका जी वसंतसेना तिचा उपकार माझ्याकडून फिटला नाहीं तोंपर्यंत मला स्वर्ग नको. तिनें दहा मोहोरा देऊन त्या द्यूतकारापासून मला सोडवलें, त्या दिवसापासून तिनें मला विकत घेतलें असें मी समजतों. [ **पुढें सरून** ] अरे, या पानांत हालतें आहे काय ! सुस्कारे कोण टाकतें आहे !

( वसंतसेना सावध होत असतां तिचा एक हात बाहेर दिसतो. )

**भिक्षु**—वाहवा ! काय चमत्कार हा ! उत्तम अलंकारांनीं भूषित असा हा हात कोणाचा असावा बरें ? अथवा विचार कशाला पाहिजे? ज्यानें मला अभय दिलें तोच हा हात. असो. नीट पहावें. ( **पानें सारून पाहून** ) अरे, हीच ती बुद्धोपासिका वसंतसेना ! पण हिची अशी दशा कां झाली ?

**वसंत०**–( **खोल शब्दानें** ) मला थोडें पाणी –

**भिक्षु**–काय ! ही पाणी मागते ? पण येथून बावडी फार दूर आहे. असो. माझी छाटी ओली आहे हीच हिच्या अंगावर घालतों.

( **वसंतसेना उठून बसते, भिक्षु वारा घालतो.** )

**भिक्षु**–आतां पाणी आणून देऊं काय ?

**वसंत०**–आर्या, तूं कोण आहेस ?

**भिक्षु**–उपासिके, तूं मला ओळखिलें नाहीं वाटतें ? दहा मोहोरा देऊन विकत घेतला तो हा.

**वसंत०**–होय मीं ओळखलें. पण तुम्ही म्हणतां तें मला स्मरत नाहीं. मी मेलें असतें तर बरें झालें असतें.

**भिक्षु**–पण तुझी अशी अवस्था कां झाली ?

**वसंत०**–( **दुःखानें** ) वेश्यापणाला जें योग्य तेंच झालें.

**भिक्षु**–बरें, तूं आतां ऊठ. मला तुला शिवतां कामा नये म्हणून ह्या जवळच्या फांदीला धरून ऊठ. ( **वसंतसेना तसें करून उठते.** )

**वसंत०**–ह्या समयीं तूं मला जीवदान दिलें असें मी समजतें.

**भिक्षु**–येथून जवळच त्या मठांत माझी धर्मभगिनी राहते, तेथपर्यंत हळूंहळूं चल. मग आपल्या घरीं जा. ( **दोघें चालूं लागतात** ). ( **पुढें पाहून** ) श्रेष्ठ जनहो, एकीकडे व्हा. ही तरुण स्त्री आहे आणि मीं भिक्षु आहे. हिला स्पर्श न व्हावा म्हणून एकीकडे व्हा—

## पद.

**तो नर दुःखमुक्त झाला ॥ तयाच्या करीं स्वर्ग आला ॥ धृ० ॥**

ज्यानें जिंकुनि पंचेंद्रियगण, मोहनाशही केला ॥
अहंकार चांडाळ जयानें, नष्टदशेला नेला ॥ १ ॥

( सर्व जातात. )

**अंक पांचवा समाप्त.**

---

# अंक ६ वा.

## न्यायसभा.

**शोधनक**—न्यायाधीशांनीं आज्ञा केल्याप्रमाणें न्यायसभेंत बैठक तयार करून ठेविली, पण अद्याप कोणींच आलें नाहीं हें कसें? अरे, हे कोण आले! ( **पाहून** ) काय राजशालक संस्थानक इकडे येत आहे! तर या दुर्जनाची नजर चुकवून आपण दूर रहावें हें बरें. [ जातो ]

**शका०**—[ प्रवेश करून आपल्याशीं ]

### दिंडी.

क्षणामध्यें केशांस दिली गांठ ॥
क्षणामध्यें बांधिला जटाजूट ॥
क्षणामध्यें मोकळे केश सारे ॥
राजशालक मी दीसतों कसारे ॥ १ ॥

—विषाच्या किड्याप्रमाणें मीं दुसऱ्यासाठीं जागा करून ठेविली आहे. त्यांत कोणाला बरें घालावें? [ **विचार करून** ] हो हो! त्या दरिद्री चारुदत्तावर ह्या कृत्याची स्थापना करावी म्हणजे शोभेल. तर आतां न्यायसभेंत जावें, आणि प्रथम फिर्याद करावी कीं, चारुदत्तानें द्रव्यलोभास्तव वसंतसेनेला बाहुपाश घालून मारली. [ **चालून** ] हीच न्यायसभा. [ **पाहून** ] हा कोण आला?

**शोध०**—( **येऊन** ) न्यायाधीशांनीं मला कोणी फिर्यादी आहे काय हें पाहण्यास सांगितलें आहे. तर पाहूं कोणी आहे कीं काय. ( **मोठ्यानें ओरडून** ) कोणी फिर्यादी आहे काय, फिर्यादी?

शका०— अरे हा तर अर्जदारालाच हांक मारतो. ( **डौलानें** ) अरे ए शोधनका, न्यायाधीशाला कळीव कीं राजशालक संस्थानक फिर्यादी आले आहेत.

शोध०—आज पहिल्यानेंच हा राजशालक फिर्यादी आला आहे काय? महाराज, आपण अंमळ थांबा, मी आंत कळवून येतों. ( **तसें करून** ) महाराज, न्यायाधीश म्हणतात कीं, तुम्ही आज जा. तुमची फिर्याद पहायला आज अवकाश नाहीं.

शका०—काय, माझी फिर्याद न्यायाधीश पहात नाहीं काय? कांहीं चिंता नाहीं; जर तो पहात नाहीं तर माझा मेव्हणा भगिनीपति पालकराजा याची विनंति करून व बहिणीची भीड घालून दुसरा न्यायाधीश आणवितों. ( **रागानें जाऊं लागतो.** )

शोध० —महाराज, घटकाभर थांबा. तुमचें बोलणें न्यायाधिशांना जाऊन कळवितों. ( **जाऊन येतो.** ) तुम्हांला न्यायाधीश बोलावताहेत व तुमची फिर्याद आजच पाहतों असें ह्मणतात, चला.

शका०—( **मनांत** ) पहिल्यानें म्हणाले "पहात नाहीं," आणि मग म्हणतात "पाहतों" यावरून न्यायाधीश मला भ्याले असें वाटतें. तर आतां मी जें जें सांगेन तें सर्व त्यांना खरें मानणें भाग आहे. असो; आंत जावें. ( **न्यायाधिशाजवळ बसतो.** )

न्याया०—( **मनांत** ) अहो, फिर्यादीचा हा किती तरी उद्धटपणा! ( **उघड** ) अहो, तुह्मी तेथें बसा. ( **जागा दाखवितो** )

शका०-आं, काय म्हणतां? ही सर्व भूमि माझीच आहे. मला पाहिजे तेथें मी बसेन. [ **श्रेष्ठीस** ] हा मी बसलों पहा. [ **शोधनकास** ] अहो, मी येथेंच बसेन. [ **न्यायाधिशाच्या डोकीवर हात ठेवून** ] हा मी येथें बसलों.

न्याया०—आपण फिर्यादी आहां काय?

शका०-यांत काय संशय?

न्याया०—काय फिर्याद? बोला.

**शका०**—मी तुमच्या कानांत सांगेन, मी मोठया अगडबंब कुळांत उत्पन्न झालों आहे. माझा बाप राजाचा सासरा आहे. माझ्या बापाचा राजा जांवई आहे. मी राजाचा मेव्हणा आहें. समजलां ?

**न्याया०**—हें सर्व खरें आहे, परंतु--

## श्लोक.

**किं कुलेनोपदिष्टेन, शीलमेवात्र कारणम् ॥**
**भवंति नितरां स्फीता सुक्षेत्रे कंटकद्रुमाः ॥**

--असो; तुमची फिर्याद काय आहे बोला.

**शका०**--मी असें म्हणतों कीं, जरी मीं अपराध केला तरी माझें कोण काय करणार आहे ? माझ्या मेव्हण्यानें सुप्रसन्न होऊन मला क्रीडायला म्हणा, रक्षायला म्हणा, किंवा छेदायला म्हणा, सर्व उद्यानांमध्यें श्रेष्ठ असें जें पुष्पकरंडक नामक जीर्णोद्यान दिलें आहे, तें उद्यान पहायला, पुष्ट करायला, अथवा शुष्क करायला म्हणा, मी तेथें नेहमीं जात असतों. तेथें पडलेलें स्त्रीचें प्रेत मी दैवयोगानें पाहतों किंवा पाहात नाहीं; हो हो मीं काल पाहिलें.

**न्याया०**--ती स्त्री कोणाची कोण हें तुम्हांला माहीत आहे काय ?

**शका०**—अहो, ती ठाऊक कशी नाहीं असणार ? अहो, ती या नगरीचें भूषण अशी अलंकारांनीं भूषित वसंतसेना, तिला कोणी कुपुत्रानें धनलोभास्तव बाहुपाशानीं मुद्दाम मारलें. मीं नाहीं हो !

**न्याया०**--नगरांतील रखवालदारांची फारच सुस्ती ही. असो; अहो श्रेष्ठी कायस्थ, "मीं नाहीं हो" हाच या खटल्याचा मुद्दा लिहून ठेवा.

**श्रेष्ठी**--आज्ञा ( **लिहून ठेवितो.** )

**शका०**--( **मनांत** ) काय हें आश्चर्य ? बोलण्याचे घाईनें मीं भलतेंच बोलून आपला नाश करून घेतला. असो, आतां संपादणी केली पाहिजे. ( **उघड** ) अहो न्यायाधीश, मी बोललों तें तुम्ही समजलां नाहीं, मीं पाहिली असें मी म्हणालों, उगीच असें काय करितां ? ( **पायानें तीं अक्षरें पुसून टाकितो.** )

**न्याया०**—धनलोभास्तव बाहुपाशांनीं मारली असें आपण कशावरून म्हणतां ?

**शका०**—अहो यांत काय कठीण ! अलंकार घालण्याचीं जितकीं स्थानें तितकीं सारीं रिकामीं आहेत, यावरून मीं असा तर्क केला.

**न्याया०**—हां हो ! असें असेल तर तुमचा तर्क खरा आहे.

**शका०**—( **मनांत** ) मी दैवाच्या बळानें वांचलों म्हणायचा !

**श्रेष्ठी**—( **न्यायाधिशास** ) आतां हा खटला कोणावर जाईल बरें ?

**न्याया०**—खटल्याचे प्रकार दोन आहेत. एक वाक्यानुसारें निर्णय आणि एक अर्थानुसारें निर्णय. वाक्यानुसारें निर्णय हा वादीप्रतिवादी यांच्या बोलण्यावरून केला पाहिजे, आणि अर्थानुसारें निर्णय हा न्यायाधीशाच्या बुद्धिकौशल्यावर आहे.

**श्रेष्ठी**—तर हा खटला वसंतसेनेच्या आईकडे जाईल.

**न्याया०**—हो, यांत काय संशय ? अरे शोधनका, वसंतसेनेच्या आईकडे जा आणि तिचें मन न दुखवितां तिला घेऊन ये. ( **तो जातो.** )

**शका०**—वसंतसेनेची आई कशाला पाहिजे मध्यें ?

**न्याया०**—अहो, हें न्यायाचें काम आहे, पुराव्यावांचून कोणतीही गोष्ट करितां येत नाहीं.

( **शोधनक वसंतसेनेच्या आईला घेऊन येतो.** )

**म्हातारी**—(**आपल्याशीं** ) माझी मुलगी चारुदत्ताच्या घरीं गेली आहे, आणखी हा म्हणतो कीं तुम्हांला न्यायाधिशांनीं बोलाविलें आहे. तेव्हां काय असेल बरें हें ! माझ्या पोटांत धस्स झालें आहे. कांहीं सुचत नाहीं. बाबारे, कोणत्या वाटेनें जाऊं ?

**शोध०**—आई, अशी इकडून ये.

**म्हाता०**—( **न्यायाधिशाजवळ जाऊन** ) बाबांनो, तुम्हांला उदंड आयुष्य असो.

**न्याया०**—म्हातारे आलीस, ये बैस.

**शका०**—आली कां बुड्ढी थेरडी कुंटीण, आली.

**न्याया०**—म्हातारे, तूं वसंतसेनेची आई काय ?

**म्हाता०**—होय बाबा.

**न्याया०**—बरें, या वेळेस तुझी मुलगी कोठें आहे ?

**म्हाता०**—ती आपल्या मित्राच्या घरीं गेली आहे.

**न्याया०**—तिच्या मित्राचें नांव काय ?

**म्हाता०**—ही तर लाजेची गोष्ट आहे. महाराज, हें लोकांनीं विचारावें, आपल्यासारख्यांनीं विचारूं नये.

**न्याया०**-हरकत नाहीं. हें न्यायाचें काम आहे.

**म्हाता०**-तर मग सांगते. वेणीदत्तशेटीचा नातू, सागरदत्त शेटीचा मुलगा ज्याचें नांव श्रेष्ठ चारुदत्त, त्याच्याकडे माझी मुलगी यौवनसुखाचा अनुभव घेण्याकरितां गेली आहे.

**शका०**—[ **आवेशानें उठून** ] ऐकलें का ? ऐका. हीं अक्षरें लिहून ठेवा आतां चारुदत्तावर माझी फिर्याद आहे.

**श्रेष्ठी०**-चारुदत्त तिचा मित्र आहे यांत कांहीं त्याचा दोष नाहीं.

**न्याया०**-असो, हा खटला चारुदत्तावर जातो, यांत कांहीं संशय नाहीं.

**श्रेष्ठी**—होय असेंच वाटतें खरें.

**न्याया०** -अहो, वसंतसेना चारुदत्ताच्या घरीं गेली आहे हीं अक्षरें लिहून ठेवा. ह्या खटल्याचा मुख्य मुद्दा हाच. आतां चारुदत्ताला बोलावून आणलें पाहिजे. अथवा व्यवहार बोलावितो, आमच्याकडे काय आहे ? शोधनका, त्या श्रेष्ठ चारुदत्ताकडे जा आणि कांहीं कारणाकरितां न्यायाधीश आपल्या दर्शनाची इच्छा करिताहेत, तर तेथपर्यंत एकवार चलावें असें सांगून घाई न करितां त्याच्याच छंदाप्रमाणें सत्कारपूर्वक त्याला घेऊन ये.

[ **शोधनक जातो व चारुदत्तास घेऊन येतो.** ]

**चारु०**-[ **सचिंत** ] राजाला माझें कुलशील माहीत असून आज जेव्हां मला न्यायाधिशांनीं बोलाविलें आहे, तेव्हां कांहीं ठीक लक्षण दिसत नाहीं. [ **अपशकुन झालासें दाखवून** ] अरे-

**पद. ( चाल लावणीची )**

**आर्द्र नसुनि हा भूमिभाग कां स्खलन चालतां बहु होतें ।**
**वामबाहु कां कंप पावतो स्फुरण येत कां नयनांतें ॥ १ ॥**

शकुनि पक्षि हे दुःशब्दानें भेदिति कां मम हृदयातें ॥ कर्कश
रव हा वायस करिती दूत दटाविति कां मातें ॥ २ ॥ चाल ॥
हा भुजंग पडला मार्गावरि येउनी । कां फुगवि उदर हा
वक्र असा होउनी । कां जिव्हां हलवी अशि मजला लक्षुनी ॥
पाहुनि हे अपशकुन यापरी माझ्या मनिं येतें । कृतांत धांवुनि
संनिध आला पसरुनियां निजवदनातें ॥ ३ ॥

--असो, सर्व प्रकारें संरक्षण करणार ईश्वर समर्थ आहे.

**शोध०**—आर्या चारुदत्ता, असा इकडून ये.

**न्याया०**- हाच काय चारुदत्त ? वः, याची आकृति कशी आहे ? वाटोळे गरगरीत डोळे, उंच कपाळ, ह्या याच्या आकृतीवरून याच्या ठिकाणीं अपराध संभवत नाहीं. कारण—

## श्लोक.

नागेषु गोषु तुरगेषु तथा नरेषु ॥
नह्याकृतिः सुसदृशं विजहाति वृत्तम् ॥ १ ॥

**चारु०**—अधिकाऱ्यांचें कल्याण असो. अहो नियुक्त पुरुषांनो, तुमचें कुशल असो.

**न्याया०**—आर्या चारुदत्ता, तुझें स्वागत असो. अरे शोधनका, या श्रेष्ठाला बसावयास आसन दे. [ **चारुदत्त बसतो** ].

**शका०**—[ **रागानें** ] आलास कायरे, स्त्रीघातक्या आलास ? [**गर्वानें** ] वाहवारे न्याय ! वाहवारे व्यवहार ! काय अधर्म हा ! स्त्रीघातक्या अपराध्यांना आसन बसायला देतात; असो, देऊं द्या. पाहतों आतां.

**न्याया०**—आर्या चारुदत्ता, हिच्या लेकीबरोबर तुझी मैत्री आहे काय ?

**चारु०**—कोणाच्या ?

**न्याया०**—ह्या म्हातारीच्या ? [ **तिला दाखवितो.** ]

**चारु०**—आर्ये, तुला अभिवंदन करितों.

**म्हाता०**—वत्सा, तुला उदंड आयुष्य असो. हाच तो चारुदत्त, ह्यालाच माझ्या मुलीनें नवयौवन अर्पण केलें.

**न्याया०**—आर्या, ती गणिका तुझी मित्र आहे काय ?

**चारु०**--[ **लाजल्यासारखें करितो.** ]

**शका०**--लाजेनें किंवा भयानें आपलें दुष्कर्म छपवितोस काय ? द्रव्य-लोभास्तव वसंतसेनेचा घात करून आतां मुकाट्यानें बसतोस काय ? हा राजशालक तसें करणारा नव्हे.

**न्याया०**--आर्या, हा न्याय आहे. लाज काय कामाची ? खरें सांग काय तें.

**चारु०**--अधिकाऱ्यांनो, ती गणिका माझी मित्र आहे असें मी कसें सांगूं ? अथवा हा यौवनाकडे दोष आहे, चारित्र्याकडे काय आहे ?

**न्याया०**--आर्या चारुदत्ता, येथें ब्राह्मण सभासद आहेत. अधर्मशंका मनांत आणूं नकोस. हा व्यवहार आहे. येथें लाज काय कामाची ?

**चारु०**--अहो माझा कोणाबरोबर व्यवहार, आणि माझ्यावर फिर्याद करणारा कोण ?

**शका०**--अरे मी मी, माझ्याबरोबर आहे तुझा व्यवहार.

**चारु०**--तुझ्याबरोबर काय ! मग मात्र प्रसंग कठीण आहे.

**शका०**--अरे स्त्रीघातक्या ! सोन्यामोत्याच्या अलंकारांनीं भूषित अशी जी वसंतसेना, तिला मारून आतां साधुपणाचा डौल मिरवितोस काय ?

**चारु०**--काय भलतेंच बोलतोस हें ?

**न्याया०**--आर्या चारुदत्ता, तूं त्याच्याशीं कशाला बोलतोस ? आम्ही विचारतों तें सांग. ती गणिका तुझी मैत्रीण आहे कीं नाहीं ?

**चारु०**--होय, आहे खरी.

**न्याया०**--बरें, आतां ती वसंतसेना कोठें आहे ?

**चारु०**--ती आपल्या घरीं गेली.

**न्याया०**--ती घरीं कशी गेली, केव्हां गेली व बरोबर कोण होतें तें सांग.

**चारु०**--[ **मनांत** ] ती कां लपून छपून गेली असें सांगूं ? [ **विचार करितो.** ]

**श्रेष्ठी०**--आर्या, सांग सांग लौकर.

**चारु०**—घरीं गेली इतकें मला माहीत आहे, याहून मला कांहीं माहीत नाहीं.

**शका०**—अरे माझ्या पुष्पकरंडक जीर्णोद्यानांत नेऊन धनलोभास्तव बाहुपाशांनीं मारून आतां ती घरीं गेली असें म्हणतोस काय !

**चारु०**—अरे, असें असंबद्ध भाषण करणाऱ्या, तुझ्या तोंडाकडे पाहून मला संशय येतो. कारण गुप्तपणें नीच कर्म करणाऱ्याप्रमाणें तुझे ओठ काळे दिसतात, आणि हेमंत ऋतूंतल्या कमलाप्रमाणें तुझें तोंड निस्तेज दिसतें.

**न्याया०**—हा श्रेष्ठ चारुदत्त असें नीच कर्म कसें करील बरें ?

**शका०**—पक्षपातानें न्याय होत आहे बरें !

**न्याया०**—चल मूर्खा, चारुदत्तावर असा भलताच आरोप करितांना तुझी जिव्हा कशी झडली नाहीं ? तुझा देह कसा गळून पडला नाहीं ? अरे--

## साकी.

अगणित धनदानाने केलें, जन बहु तुष्ट जयानें ॥
धर्माचरणीं मग्न असे जो नम्र सदा विनयानें ॥
नरवर तो ऐसे ॥ पातक आचरील कैसे ॥ १ ॥

**शका०**—पक्षपातानें होतो आहे बरें न्याय !

**म्हाता०**—अरे दुष्टा चांडाळा ! ज्यानें ठेव म्हणून ठेविलेले सुवर्णालंकार चोरानें नेले म्हणून त्याच्या मोबदला पृथ्वीच्या मोलाची रत्नमाला दिली, तो धनलोभास्तव असें अकार्य कसें करील ? कोणा मेल्याचें हें कर्म असेल तें असो. या बापड्यावर विनाकारण आरोप आला आहे. माझी वया मला टाकून कोठें गेली ! [ रडूं लागते. ]

**न्याया०**—आर्या, ती पायांनीं कीं गाडींत गेली ?

**चारु०**- खरें विचाराल तर ती माझ्या देखत कांहीं गेली नाहीं; मग ती कशी गेली हें मी काय सांगूं ?

( **वीरक येऊन प्रणाम करितो.** )

**न्याया०**—कोण हा ? नगररक्षक वीरक ? कां आला बरें ?

**वीर०**--महाराज, सरकारांनीं कैद करून ठेवलेला आर्यक पळाला, त्याला मी शोधीत असतां, एक बुरख्याची गाडी जातांना माझ्या दृष्टीस पडली.

ती कोणाची, काय वगैरे विचारपूस करीत असता, " तूंच पाहणारा कोण ? ही गाडी मी पाहणार, " असा तंटा करून चंदनकानें मला लाथा मारल्या. तर सरकारांनीं माझी दाद घ्यावी ही विनंति आहे.

**न्याया०**—बरें ती गाडी कोणाची याची चौकशी तूं केलीस का ?

**वीर०**—होय महाराज, त्या गाडीवाल्याला विचारिलें त्यावेळेस तो म्हणाला " ही गाडी चारुदत्ताची असून आंत वसंतसेना बसली आहे, व पुष्पकरण्डक जीर्णोद्यानांत क्रीडा करण्याकरितां चालली आहे. "

**शका०**—अहो हें पुनः ऐकून घ्या. नुग्राची गोष्ट आहे. लिहून ठेवा. यावरून मी म्हणतों हें खरें किंवा खोटें याविषयीं तुमची खात्री झाली असेलच.

**न्याया०**—( **मनांत** ) चारुदत्तरूपी चंद्राला ग्रासण्याकरितां हा दुष्ट राहूच उत्पन्न झाला आहे कीं काय कोण जाणे. असो; वीरका, तुझा न्याय मागाहून पाहूं. अगोदर बाहेर दरवाज्यापुढें घोडा तयार आहे, त्यावर बसून पुष्पकरंडक जीर्णोद्यानांत जा आणि तेथें एखादें स्त्रीचें प्रेत पडलें आहे कीं काय हें पाहून ये.

**वीर०**—( **जाऊन परत येऊन** ) महाराज, तेथें एक स्त्रीचें प्रेत पडलें आहे, परंतु कोल्ह्याकुत्र्यांनीं खाल्ल्यामुळें अमकीचेंच असें म्हणतां येत नाहीं.

**न्याया०**—बरें, पण तें प्रेत स्त्रीचेंच असें तूं कशावरून म्हणतोस ?

**वीर०**—तिचे केस आणि हातपाय तुटून पडले आहेत यावरून मी म्हणतों.

**न्याया०**—शिव ! शिव ! लोकांच्या दुर्वर्तनास धिक्कार असो ! जसजसा जास्त विचार करावा तसतसा अधिकच दोष दृष्टोत्पत्तीस येतो. एकंदरींत ही व्यवहारवृत्ति कांहीं चांगली नव्हे हेंच खरें.

**चारु०**—हा दुर्दैवा ! काय दशा ही !

## पद.

फुलतांचि कुसुम ते येति मधुप धांवोनि ॥
मकरंद तयांतिल सेवाया लागोनि ॥

—बरें उलटपक्षीं—

येतांचि दुर्दशा नरा छिद्र तें बघुनी ॥
बहु अनर्थ पडती तयावरी येवोनी ॥ १ ॥

न्याया०—आर्या, हा राजशालक म्हणतो ही गोष्ट तुझ्याकडून घडली कीं नाहीं ?

चारु०—तुम्ही त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून मला विचारता कीं ही गोष्ट तुझ्याकडून घडली कीं नाहीं. परंतु विचार करा कीं, जो दुष्ट, घातकी, नेहमी असत्य बोलणारा, अशा मनुष्याचें भाषण कोणी तरी विचारी मनुष्य खरें मानील का ? आणि दुसरें असें ध्यानांत आणा कीं—

पद. ( असावरी. त्रिताल. )

काय वधिन मी ती सुमती ॥ नवयुवती अबला, साश्रुलोचना धरुनि कुरल कुंतल या हातीं ॥ धृ० ॥ कोमल कुसुमित लता कधींही ॥ लववुनि कुसुमें खुडिलीं नाहीं ॥ आजवरी ती ॥ १ ॥

शका०—‾,य हो, अद्यापि तुम्ही पक्षपातानें न्याय चालवितां ? हा चारुदत्त धडधडीत दोषी असून त्याला तुम्ही आसनावर बसूं देतां हें काय ?

न्याया०—शोधनका, तसें कां करीनास ?
शोध०—( चारुदत्तास खालीं उतरावयास सांगतो. )
चारु०—नीट विचार करा बरें ! [ खालीं उतरतो ]

शका०—[ आनंदानें आपल्याशीं ] वाहवा ! मीं केलेलें पाप दुसऱ्याच्या डोकीवर कसें चढलें पहा ! आतां ज्या आसनावर चारुदत्त बसला होता, त्या आसनावर मी बसतों. [ तसें करून ] चारुदत्ता, आतां बघ तर खरा माझ्याकडे आणि मीच मारली असें बोल.

चारु०—अहो अधिकाऱ्यांनो, नीट विचार करा, या दुष्टाच्या बोलण्यावर विश्वास ठेवूं नका. [ सुस्कारा टाकून ]—

पद. ( चाल—निज मख रक्षाया. )

मजवरि हें आलें ॥ संकट कैसें ॥ मित्रा नच कळलें ॥
॥ धृ० ॥ उत्तम कुलिं तूं झालिस कांते ॥ काय तुझी गति
होईल विमले ॥ १ ॥ बाळा सुकुमारा कुमारा ॥ हृदया-
नंदकरा ॥ बाळपणीं या खेळ सुखानें ॥ सौख्य पुढें तुज
कांहीं न उरलें ॥ २ ॥

—( चिंतन करून ) वसंतसेनेकडील वर्तमान घेऊन येण्याकरितां मैत्रेयाला तिकडे पाठविलें आहे. आणि मुलाला गाडी करण्याकरितां तिनें जे अलंकार दिले होते ते नेऊन देण्याकरितां त्याला सांगितलें आहे. तो अजून घरीं आला कीं नाहीं ? आणि त्याला हें वर्तमान कळलें कीं नाहीं ? पण त्याला जर हें कळलें असतें तर तो ताबडतोब इकडे आला असता.

[ दागिन्यांची गाठोडी घेऊन मैत्रेय येतो. ]

मैत्रे०—हे अलंकार वसंतसेनेला देऊन आपण लवकरच माघारें परतावें. ( इकडे तिकडे फिरून ) कोणरे हा ? रेभील ? रेभिला, तूं असा उद्विग्न कां दिसतोस ? ( ऐकलेंसें करून ) काय म्हणतोस, माझ्या मित्राला न्यायसभेंत बोलावून नेलें ? असो, आधीं तिकडे गेलें पाहिजे. वसंतसेनेकडे मग जाईन. [ इकडे तिकडे पाहून ] हीच ती न्यायसभा. तर आतां आत जावें. [ जाऊन ] अधिकाऱ्यांनो, तुमचें कुशल असो. अहो पण माझा मित्र चारुदत्त कोठें आहे ?

न्याया०—तो आहे पहा. ( दाखवितो. )

मैत्रे०—मित्रा, कुशल आहेना ?

चारु०—झालें तर होईल !

मैत्रे०—क्षेम तरी ?

चारु०—तेंही तसेंच.

मैत्रे०—अरे, तूं असा उद्विग्न कां दिसतोस ? तुला येथें कोणी बोलाविलें आणि हें आहे काय ?

चारु०—मित्रा काय सांगूं !—

### साकी.

इहपरलोकांविषयीं शंका सोडुनि ज्यां दुष्टानें ॥
साक्षात् दुसरी रतिच अशी स्त्री, पुढिल वदावें त्यानें ॥ १ ॥

मैत्रे०-मित्रा, काय काय ?

चारु०-[ कानांत ] असें.

मैत्रे०-कोण ? कोण असें म्हणतो ?

चारु०-[ शकारास दाखवून ] हे राजेश्री कृतांतस्वरूप अनुवादक होऊन असें म्हणताहेत, आणि माझी अशी दशा होण्याला हेच कारण.

मैत्रे०-अरे, पण ती आपल्या घरीं गेली असें कां तूं सांगत नाहींस ?

चारु०-मित्रा, मीं सर्व सांगितलें, परंतु--

### दिंडी.

जेथ मित्रा तत्त्वार्थ पहायाला ॥
शक्ति नसते भूपाललोचनाला ॥
तिथें वक्त्याला दैन्य रोकडें तें ॥
समज अथवा बहु निंद्य मरण येतें ॥ १ ॥

मैत्रे०-अहो अधिकाऱ्यांनो, तुम्ही मुज्ञ आहां. मीं बोलून दाखवावें असें नाहीं. अहो, ज्या पुरुषानें परोपकारार्थ बागा, देवालयें, तळीं इत्यादि धर्मकृत्यें करून ज्या उज्जयिनी नगरीला शोभा आणली, तो हल्लीं दारिद्री झाला, म्हणून निंद्य कर्म करील काय ? ( शकारास ) अरे रांडलेका ! राजशालका संस्थानका ! दुष्टा, अंगावर सोन्यामोत्यांचे दागिने घालून माकडासारखा नटून मोठी प्रतिज्ञा मारतोस काय ? माझ्यापुढें बोल पाहूं ! अरे हा माझा मित्र किती दयाळू, किती उदार, याची योग्यता तुला माकडाला काय सांगून उपयोग ? अरे, जो पान तुटेल या भीतीनें लता देखील वांकवीत नाहीं, तो उभय लोकांविरुद्ध असें दुष्ट कृत्य करील काय ? अशा पुरुषावर तुफान घेतोस? थांब, तुझें डोकेंच फोडून टाकतों. ( दोघांची मारामारी होते, मैत्रेयाच्या खांकेंतून गांठोडी पडते. )

शका०- ( गाठोडी घेऊन ) पहाहो हा मुद्दा. हेच त्या बिचाऱ्या गणिकेचे अलंकार यानें आपल्या सोबत्यापाशीं दिले होते.



चारु०—दुर्दैवानें वेळ साधिली, यी समयींच हा पडला ॥ अलंकारसमुदाय भूवरी... ॥ (पृ. ९७)

चारु०—हर हर–

## साकी.

दुर्दैवानें वेळ साधिली, या समयिंच हा पडला ॥
अलंकारसमुदाय भूवरी पाडिल खचितचि भजला ॥
घोर अशा व्यसनीं ॥ उरली प्राणाशा न मनीं ॥ १ ॥

न्याया०—अरेरे! फार वाईट गोष्ट झाली.

श्रेष्ठी—म्हातारे, तुझें लक्ष इकडे आहेना? हे दागिने कोणाचे?

म्हाता०— तसे दिसतात. पण हे ते नव्हेत.

शकार—डोळ्यांनीं बोलतेस तसें वाचेनें कां पहात नाहींस?

म्हाता०—मोठा शहाणा आला आहे! चल निघ मेल्या.

न्याया०—बाई, नीट पहा, हे दागिने तेच कीं दुसरे आहेत?

म्हाता०—महाराज, कारागिराची कुशलता पाहून भ्रांति पडते, पण ते हे नव्हेत.

न्याया०— तर मग हे दागिने कोणाचे हें तुझ्यानें सांगवेल?

म्हाता०—महाराज, मीं सांगितलेंना, कीं ते हे नव्हेत. कारागिरांनीं तसे घडविले असतील. कोणाचे तें मी काय सांगूं?

न्याया०—हा असेंही असेल. वस्तूसारख्या वस्तू पुष्कळ असतात.

श्रेष्ठी—चारुदत्ता, हे दागिने तुझे आहेत काय?

चारु०—नाहीं, येथें जी म्हातारी बसली आहे तिच्या मुलीचे.

न्याया०—तर हे तुझ्याकडे कसे आले?

चारु०—सांगतों ऐकावें. ती माझ्या घरून जातेवेळीं तिनें माझ्या मुलाला गाडी करण्याकारितां दिले होते.

न्याया०—आर्या, खरें असेल तेंच सांग.

शका०—तिला प्रथम पुष्पकरंडक जीर्णोद्यानांत नेऊन मारून तिच्या आंगावरचे दागिने घेतलेस, आणि आतां असें सांगतोस?

न्याया०—आर्या चारुदत्ता, खरें सांग. जर तूं खरें न बोलशील तर निरुपायास्तव खरें बोलण्याबद्दल तुला कडक शिक्षा करावी लागेल.

चारु०—महाराज, होणारापुढें इलाज नाहीं. मीं तर पाप मुळींच केलें

नाहीं. आतां तुह्मी बलात्कारानें माझ्या अंगीं लावतां, तर माझा काय उपाय आहे ? ( **मनाशीं** ) आतां वसंतसेनेशिवाय मला तरी वांचून काय करायचें आहे ? ( **उघड** )–

( **इहपरलोकाविषयीं इत्यादि पूर्वोक्त साकी म्हणतो.** )

**शका०**—मी म्हणतोंच आहें "तूं मारिलीस" म्हणून. अरे तूं आपल्या तोंडानें बोल "मीं मारली" असें.

**चारु०**—तें तूंच बोल.

**शका०**—ऐका ऐका, अहो अधिकाऱ्यांनो ऐका. यानें मारली असें याच्याच बोलण्यावरून सिद्ध झालें. आतां याला दंड करणें तो करावा.

**न्याया०**—अरे शोधनका, राजशालक म्हणतो तसें केलें पाहिजे. दूतांनो, धरा या चारुदत्ताला आणि बांधा.

**म्हाता०**—अहो न्यायाधीशमहाराज, कृपा करा. वसंतसेनेची ठेव चोरांनीं नेली असून ज्यानें भरून दिली, तो पुरुष असें अकार्य करील काय ? माझी मुलगी मेली ती मेली. तिचें आयुष्यच संपलें. तिच्याकरितां या श्रेष्ठाला मारूं नये. दुसरें, या वादांत मी वादी आणि हा श्रेष्ठ प्रतिवादी आहे; तेव्हा मी सांगतें कीं माझा आरोप या चारुदत्तावर मुळींच नाहीं, यासाठीं आपण याला सोडावें.

**शका०**–अगे ए गर्भदासी कुंटिणी, चल निघ येथून. याचा तुझा काय संबंध आहे ? याच्याशीं तुला काय करायचें आहे ?

**न्याया०**–बाई, तुझें बोलणें कांहीं उपयोगी नाहीं. आतां तूं जा. कोण आहेरे तिकडे ? काढा याला बाहेर.

**म्हाता०**—बाळा, तुझा शेवट असा व्हावा काय ! [ **जाते.** ]

**शका०**—मला जें करावयाचें होतें तें मीं आपल्यासारखें केलें.

**न्याया०**—आर्या चारुदत्ता, हा राजाच्या घरचा व्यवहार आहे. न्याय करणें आम्हांकडे आहे, तरी शोधनका, पालकराजाला असें सांग, कीं मनूच्या वचनाप्रमाणें वध्य असला तरी ब्राह्मण मारूं नये. याकरितां आमच्या मतें याला हद्दपार करावें.

( **शोधनक जाऊन येतो.** )

**शोध०**—महाराज, आपल्या आज्ञेप्रमाणें कळविलें; परंतु त्यांनीं अशी

आज्ञा केली कीं, द्रव्यलोभास्तव ज्यानें स्त्री मारली तो जरी ब्राह्मण असला तरी त्याची धिंड काढून त्यानें वसंतसेनेला ज्या ठिकाणीं मारलें, त्या ठिकाणीं मार देऊन दक्षिण स्मशानांत सुळीं द्यावा अथवा त्याचा शिरच्छेद करावा, आणि जो कोणी असा अपराध करील त्याला याप्रमाणें शासन होईल अशी ताकीद करावी.

**चारु०**—कायहो अविवेक हा ! पालकराजाला कांहींच विचार नाहीं; अथवा त्याच्याकडे तरी काय दोष !

**पद.** ( चाल—कल्पतरू हे जिकडे तिकडे. )

ऐशा व्यवहाराभिंत मंत्री लोटुनि ज्या देती ॥
तया नृपाच्या करीं सदा ते अविचारचि होती ॥ १ ॥
दोष नव्हे हा भूपाळाचा, मंत्रि कुटिल असती ॥
श्वेत काकसे राजशासना, दूषण जे आणिती ॥ २ ॥
केवळ यांच्या अन्यायानें, मृत्युमुखीं पडती ॥
निरपराधि जन किति निष्पापी, नाहिं तयां गणती ॥ ३ ॥

—सख्या मैत्रेया, जा; माझ्या मातेला माझा प्रणाम सांग आणि तिला पुत्र-शोक न बाधे असें कर. माझ्या स्त्रीला फार फार विचारलें म्हणून सांग, आणि माझा पुत्र रोहसेन लहान आहे त्याचा प्रतिपाल कर.

**मैत्रे०**—मित्रा, मूळ तुटल्यावर वृक्षाचें पालन कसें होणार ?

**चारु०**—मित्रा, असें म्हणूं नको. पुत्र पित्याचा आत्मा अशी श्रुती आहे, करितां माझ्यावर जसें प्रेम होतें तसेंच त्याच्यावर कर.

**मैत्रे०**—मित्रा, तूं माझा प्रिय मित्र असतां तुझा अंत झाल्यावर मी जिवंत कसा राहीन बरें ?

**चारु०**—कसेंही करून माझ्या पुत्राची आणि माझी एकवार भेट करीव.

**मैत्रे०**—बरें, जातों. [ जातो. ]

**न्याया०**—शोधनका, आरोपीस दूर ने आणि मांगांस आज्ञा दे कीं, याला घेऊन जाऊन राजाज्ञेप्रमाणें करा.

**शोध०**—श्रेष्ठा चारुदत्ता, ये असा इकडून—

चारुदत्त—

पद. [ झंपा ]

अधम किति पालका असासि भूपा ॥ न्यायपथ सोडिसी पापकूपा ॥ धृ० ॥ सत्व घ्यावे असें चित्तिं होतें तरी वन्हि, विष, जल, तुला यांहि अथवा ॥ कंठ माझा तुवां कापुनी करवतीं ॥ शांतवाया मना प्राण घ्यावा ॥ १ ॥ टाकुनी मार्ग हा शत्रुवचनें कसें, मारिसी मज असें ब्राम्हणाला ॥ पुत्रपौत्रांसवें नरकिं जाशीलरे, हाचि माझा असो शाप तुजला ॥ ३ ॥

[ सर्व जातात. ]

अंक ६ वा समाप्त.

---

# अंक ७ वा.

## राजमार्ग.

[ दोन चांडाळ व चारुदत्त येतात. ]

**चांडाळ**–[ **लोकांस उद्देशून** ] आम्ही कोण हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? वधकर्मांत निपुण झालेले आम्ही चांडाळ. आमच्या अंगीं मुख्य गुण म्हटले म्हणजे, वध्यास फार यातना न होऊं देतां, त्याचा शिरच्छेद करणें, हा एक; व शूलारोपण करण्याच्या कामीं कुशलता; हा दुसरा, ऐकलें ? तर व्हा दूर. पौरहो, प्रतिक्षणीं क्षीणायु होत आहे, अशा या श्रेष्ठ चारुदत्ताला काय पाहतां ? रस्ता सोडा. या नगरोद्यानाची शोभाच असा हा महावृक्ष आम्ही काळ-पुरुष तीक्ष्ण कुठारीनें लवकरच तोडणार, तर याला काय पाहतां ? चारुदत्ता, चल ये इकडे.

**चारु०**–आज मला ही दशा येईल असें स्वप्नांत सुद्धां नव्हतें. एकूण " दैवी विचित्रा गती " असें म्हणतात तें खोटें नाहीं. काय दशा ही !–

**पद.** ( चाल—रमाकांत नये आजि सये. )

हा सकल देह रक्तचंदनें विलेपिला ॥ यज्ञपशूसम यांनीं सजविलें मला ॥ धृ० ॥ कुदशा ही ऐसि बघुनि ॥ ढाळिति जन अश्रु नयनिं । दोष देति धिक्कारुनि ॥ मनुजयोनिला ॥ १ ॥ रक्षाया बल न म्हणुनि ॥ वदती हे कर जोडुनि ॥ दीर्घकाल सुरभुवनीं ॥ होउं सुख तुला ॥ २ ॥

चांडा०—लोक हो, पाहतां काय ? तुम्हांला माहीत नाहीं काय—

**ओवी.**

इंद्रधनू आणि गोप्रसूति ॥ नक्षत्रांची अधोगती ॥
सत्पुरुषांची प्राणविपत्ती ॥ पाहूं नयेत हीं चार ॥ १ ॥

चारु०—( करुणायुक्त होऊन ) हर हर काय प्रसंग हा—

**साकी.**

सौधावरि बैसोनि कामिनि बघती गवाक्षद्वारें ॥
म्हणति मला हा चारुदत्त । हीं काय दशा तुजलारे ॥
शोकें तळमळती ॥ अतरिं बहुताचे हळहळती ॥ १ ॥

चांडा०—चारुदत्ता, ये इकडे. [ दुसऱ्यास ] हा चव्हाटा, दवंडी पिटण्याचें ठिकाण. तूं मोठयानें अपराध बोल, मी दवंडी वाजवितों.

दु०चांडा०—ऐकाहो लोक, ऐका. हा विनयदत्त शेटीचा नातू, सागरदत्त शेटीचा मुलगा, याचें नांव श्रेष्ठ चारुदत्त. हा अपराधी आहे. यानें या उज्जयिनीनगरांतील नामांकित गणिका जी वसंतसेना तिचा धनलोभास्तव पुष्पकरंडकनामक जीर्णोद्यानांत बाहुपाश घालून प्राण घेतला, म्हणून पालकराजानें याला मारण्याविषयीं आज्ञा दिली आहे. जर दुसरा कोणी उभयलोकांविरुद्ध असें वर्तन करील तर त्यालाही पालकराजा हेंच शासन करील हो.—

चारु०—हाय हाय ! काय दैव हें !—

**दिंडी.**

यज्ञकर्मीं विख्यात गोत्र माझें ॥
असे विप्रांहीं योग्य वदाया जें ॥
मरणसमयीं तें नीच बोलताती ॥
दुष्कृताचा संबंध लाविताती ॥ १ ॥

—हर हर ! प्रिय वसंतसेने !—

**पद. ( ललत—त्रिताल. )**

**सखे शशिवदने ॥ किती रुचिर, बिंबसम अधर, परम**
**सुकुमार ॥ धृ० ॥ धरसुधा तव पिउनि कसें गे ॥**
**अयशोविष मी सेविन सांगे ॥ विधुकरशुचिरदने ॥ १ ॥**

**चांडा०**—पौरहो, गर्दी मोडा. गुणांचा समुद्र, दुःखसागर पार जाण्याचा सेतु, संपूर्ण नगराचें भूषण, त्या श्रेष्ठ चारुदत्ताला अशा विपत्तींत काय पाहता ?

**चारु०** —

**पद. ( चाल—उधोजी मनके मनमें. )**

**माझे मित्रहि कां फिरले ॥ दीन दशा ही पाहुनि कैसें लप-**
**विति मुख अपुलें ॥ धृ० ॥ मिळति बहू वैभवकाळीं ॥ परि**
**जातां तें कोणि न जवळी ॥ येउनियां बोले ॥ १ ॥**

**चांडा०**—लोकांची दाटी मोडली; राजमार्ग मोकळा झाला. चारुदत्ता, आतां हो पुढें.

**चारु०**—होतों बाबांनो ! शिव शिव ! [ **'मजवरि हें संकट आलें कैसें०' हें पूर्वोक्त पद म्हणतो.** ]

[ **पडद्यांत 'अहो बाबा,' 'मित्रा,' असा शब्द होतो.** ]

**चारु०**—अहो चांडालहो, तुम्ही स्वजातिश्रेष्ठ आहां; तुम्हांपासून या वेळीं मी कांहीं प्रतिग्रहाची इच्छा करितों.

**चांडा०**-काय आमच्यापासून प्रतिग्रह ?

**चारु०**—शिव शिव ! प्रतिग्रह कशाचा ? कांहीं मागणें आहे. पालक राजासारखे तुम्ही अविचारी नाहीं; म्हणून परलोकास जाण्यापूर्वी एकवार माझ्या पुत्राचें मला मुख पाहूं द्या.

**चांडा०**--बरें पहा. [ **पुनः पडद्यांत शब्द होतो.** ]

**चारु०**—[ **करुणार्द्र होऊन** ] बाळा येरे ! मित्रा ये. [ **चांडाळास** ] मित्रांनो, मला एक वेळ माझ्या पुत्राचें मुख पाहूं द्या. ह्या दाटींतून माझ्यानें जाववत नाहीं.

चांडा०—अहो सज्जनहो, क्षणमात्र एकीकडे व्हा. ह्या चारुदत्ताला एकवार आपल्या पुत्राला भेटूं द्या, बाळा, बापाला भेट.

( मैत्रेय व रोहसेन येतात. )

मैत्रे०—बाळा रोहसेना, चल चल लवकर. ते पहा तुझ्या पित्याला मारायला नेत आहेत.

रोह०—

## भैरवी.

हा तात, हा तात, जासी कुठेंरे । आलों पहा मी मज
येउं देरे ॥—

मैत्रे०—हे प्रिय मित्रा, आतां तुला कोठें पाहूं ?

चारु०—बाळा रोहसेना, मित्रा मैत्रेया,—हा जगदीशा, काय प्रसंग हा !

## साकी.

चिरकालें ही न होय माझी तृषा शांत परलोकीं ॥
कारण तर्पणजल मज येथें मिळेल अल्पाचि तें कीं ॥ १ ॥

—या समयीं मी माझ्या पुत्राला काय देऊं बरें ? ( **यज्ञोपवीत** घेऊन ) हां, एवढें हें माझें सत्तेचें आहे. सुवर्णालंकारापेक्षां ब्राह्मणाला हें मोठें भूषण आहे. कारण देवपितरांची याच्याच योगानें तृप्ति होते.

( यज्ञोपवीत पुत्रास देतो. )

चांडा०—अरे चारुदत्ता, पुरे आतां. चल लवकर.

दु० चांडा०-अरे ह्या श्रेष्ठ चारुदत्ताला उपपदावांचून हांक मारतोस हें ठीक नाहीं; कारण जरी आम्ही यास मारावयास नेत आहों; तरी राहुग्रस्त चंद्राप्रमाणें तो सर्वांस पूज्य आहे.

रोह०—अरे चांडाळांनो, माझ्या बाबाला कोठें नेतां ?

चारु०—वत्सा, मी सांगतों.—

## पद. ( चाल—पांडुनृपति जनक जया० )

बाळा घालोनिया गळां ॥ रक्तसुमनांच्या माळा ॥
स्कंधांवरि स्थापियला ॥ लोहशूल हा ॥ १ ॥

ऐसें वत्सा नेति मला ॥ कंठा माझा चिरायाला ॥
यज्ञकालि जैसें पशुला ॥ नेति ओढुनि ॥ २ ॥

रोह०—होयरे चांडाळांनो ?

चांडा०—बालका, आम्ही जातीनें मात्र चांडाळ, कृतीनें नव्हे. जे दुष्ट साधूंचा छळ करितात ते खरे चांडाळ.

रोह०—तर मग माझ्या बापाला कां मारतां ?

चांडा०—लेंकरा, आम्ही नाहीं मारीत; राजाज्ञा मारते. तुला मात्र ईश्वर दीर्घायु करो.

रोह०—अहो, तुम्ही मला मारा आणि माझ्या बाबाला सोडून द्या.

चांडा०—( गहिंवरून ) बाळा, तूं चिरकाल वांच.

चारु०—( पुत्रास मिठी मारून गहिंवरून )—

## साकी.

स्नेहरसाचें सर्वस्वचि हें पुत्ररत्न समजावें ॥
राजा रंकहि आलिंगुनियां समतोषातें पावे ॥
चंदनवाळ्याची ॥ होते शतिल उटि साची ॥ १ ॥

मैत्रे०—अरे तर मला मारा, आणि माझ्या मित्राला सोडा.

चारु०—छे छे ! मित्रा, असें म्हणूं नकोस.

चांडा०—[ दुसऱ्यास ] हा दुसरा चव्हाटा, तूं अपराध बोल. मी दवंडी वाजवितों [ तसें करितात. ]

चारु०—परमेश्वरा ! माझे कान जाते तर बरें होतें.—

पद. ( चाल—जोगी. गुणगंभीरा तूं गुणि रे )

आली ही कुदशा ऐशी; जरि अनिवार ॥
दुःख नसे मजला त्याचें अंतरिं फार ॥ धृ० ॥
परी तिला वधिलें मीं हा, दोष जनांचा ॥
तव्रिशरासम भेदोनी हृदया जाई पार ॥ १ ॥
[ बद्ध केलेला स्थावरक चेट दृष्टीस पडतो. ]

स्थाव०—काय बघा अन्याय हा ! तो चारुदत्त म्हणजे निरुपद्रवी प्राणी; त्याचा अपराध नसून त्याला विनाकारण मारताहेत. माझ्या धन्यानें



चारु०—ऐसा वत्सा नेती मला ॥ कंठ माझा चिरायाला (पृ. १०४)

तर माझ्या पायांत बिडी घालून मला अडकवून ठेवलें आहे. बरें, आतां येथूनच मोठयानें ओरडावें. लोकहो, ऐका. गाडीची अदलाबदल झाल्यामुळें माझ्या गाडींत बसून वसंतसेना पुष्पकरंडक जीर्णोद्यानांत गेली. तेथें माझ्या धन्यानें ती आपलें म्हणणें कबूल करीना म्हणून तिचें नरडें दाबून मारली. चारुदत्तानें मारली नाहीं. अरे ! लोक दूर गेले, माझें बोलणें कोणी ऐकत नाहीं. आतां खालीं उडी टाकतों. मी मेलों तर हरकत नाहीं, पण दहा-जणांचा पोशिंदा वांचो. अशा कामांत मेलों तर स्वर्ग मिळेल. [ **उडी टाकतो.** ] देव तारणार तेथें काय ! बघा इतक्या उंचीवरून उडी टाकली, पण शाबूद ! बिडी मात्र तुटून गेली. आतां तिकडे जावें. थांबाहो थांबा, रस्ता सोडा.

**चारु०**—अरे हा कोण ओरडतो ?

**चेट**—मी चेट आहें. माझें बोलणें ऐका. सर्व सांगतों.

[ **" माझ्या धन्यानें मारली " वगैरे पुनः सांगतो.** ]

**चारु०**—[ **आश्चर्यानें** ] अरे काय हें आश्चर्य ! मी अगदीं कालपाशांत सांपडलों असतां हा कोण आला ? ऐका हो —

**पद. ( चाल—मांड. युवराज शिवाजिस. )**

**मज भीति नसे मरणाची कांहीं अंतरीं ॥ येणारचि येउं तया आवडे तरी ॥ धृ० ॥ निष्पापा मजसि जरी मृत्यु येई तो ॥ पुत्रजन्मसमाचि तया सुखद मानितों ॥ परि कीर्ति मलीन होय भली हानि ही खरी ॥ १ ॥**

**चांडा०**—अरे स्थावरका, हें तूं खरें सांगतोस काय ?

**चेट**— अगदीं खरें. ही बातमी कोणाला सांगेन म्हणून माझ्या धन्यानें मला तिसऱ्या मजल्यावर अडकवून ठेविलें होतें.

( **शकार येतो.** )

**शका०**—[ **आनंदानें** ] वाहवा, काय मौज झाली !-

**आम्लतिक्त मृगमांस आयतें ॥ शाकसूपसह मत्स्य रायतें ॥**

**भक्ष्य भोज्य नव पेय रक्षिलें ॥ आपुल्या घरिंच सर्व भक्षिलें ॥**

–( **कानोसा घेऊन** ) कांशाच्या तुकडयाच्या नादाप्रमाणें खणखणीत असा चांडाळांचा शब्द ऐकूं येतो; आणि वध्याच्या दोषाचा उच्चार तसाच दवंडीचा ध्वनि हीं सगळीं एकदम ऐकूं येतात. यावरून वाटतें कीं, त्या दरिद्री चारुद-

त्याला मारण्याकरितां नेत आहेत. बरें झालें. ती मौज आतां जाऊन पाहतों. कारण शत्रूचा नाश पाहून मला फार आनंद होतो; आणि मीं असें ऐकलें आहे कीं, शत्रूला मारतांना जो पाहतो त्याला नेत्ररोग कधींही व्हावयाचा नाहीं. आतां मी तिसऱ्या मजल्याच्या गच्चीवर जाऊन आपल्या बुद्धीचा प्रताप पाहतों. ( **तसें करतो.** ) या भिकारड्या चारुदत्ताला मारायला नेत आहेत, त्याला पाहण्याकरितां लोकांची इतकी दाटी झाली. मग माझ्यासारख्या श्रेष्ठ पुरुषाला मारायला नेऊं लागले तर किती गर्दी होईल बरें ? याला कसा नव्या तरण्या बैलाप्रमाणें सजविला आहे. अरे पण माझ्या वाड्यासमोर दवंडी कां थांबली ? कोणीं बंद केली कीं काय ? माझा चेट येथें कोठें दिसत नाहीं ? त्यानें पळून जाऊन मसलत फोडली तर नसेलना ? असो, तिकडे जाऊन त्याचा शोध करूं या. ( **पुढें येतो.** )

**चेट**—कां धनीसाहेब, आला काय ? ( **लोकांस** ) अहो, हाच तो.

**चांडा०**—लोकहो, मोटा धष्टपुष्ट असा हा बैल इकडे येत आहे. तर त्याला वाट सोडा.

**शका०**—अरे वेडया चेटा, तूं येथें कशाला आलास ? चल आपण जाऊं.

**चेट**—चल ! त्या बिचाऱ्या वसंतसेनेचा प्राण घेऊन ह्या बिचाऱ्याचाही प्राण घेतोस काय ?

**शका०**—खोटें बोलतोस. मी रानकुंभ्यासारखा श्रेष्ठ असून त्या स्त्रीला मारीन होय ? तुम्ही याचें काय ऐकतां ? चारुदत्तानेंच मारली.

**सर्व लोक**—नाहीं नाहीं, तुम्हींच मारली.

**शका०**—कोण सांगतो ?

**सर्व लोक**—हा भला मनुष्य सांगतो.

**शका०**—( **भय पावून** ) अरे हें कसें झालें ! हा चेट येथें कसा आला ? यानेंच मसलत फोडली. आतां दुसरी कांहीं युक्ति काढली पाहिजे. ( **विचार करून** ) अहो हा खोटें बोलतो; यानें माझें सोनें चोरलें म्हणून मीं याला खूप मार दिला होता, त्यामुळें हा असें बोलत असेल. ( **वळून हातांतील कडें चेटापुढें करून** ) अरे चेटा, तूं माझा ना ! म्हणून हें कडें घे आणि गोष्ट फिरवून सांग.

**चेट**--( **कडें घेऊन** ) पहा हो ? हा मला लालूच दाखवून गोष्ट फिरवून सांग म्हणतो.

**शका०**--अहो हेंच तें कडें, आणि याच्यासाठीं मीं याला खूप मारलें होतें. पाहिजे तर याची पाठ पहा म्हणजे समजेल.

**चांडा०**--याच्या पाठीवर वळ दिसताहेत खरे. यावरून राजशालक म्हणतो हें खरें आहे. चला आपण जाऊं.

**चेट**--बघा, चाकरी म्हणजे अशी हलकी आहे ! माझें बोलणें खरें असून तें कोणाला खरें वाटत नाहीं. [ **चारुदत्ताच्या पाया पडून** ] बाबा, माझा इतकाच इलाज !

**चारु०**—

**पद**, ( चाल—मांड. वरुदे वरुदे वरुदेश्वर. )

**उठिरे उठिरे करुणाकरा । झालासि सखा आजि खरा ॥**
**निष्कारण ही सुदया करिसी, पतितावरि या साधुवरा ॥**
**मज वांचविण्यास्तव बा किती रे ॥ सायास तुंवा केलेंसि बरें ॥**
**परि दैव नसे अनुकूल मला यश नाहीं आलें तुझिया करा ॥**

**शका०**—अहो, या चेटाला मार देऊन घालवून द्या. अरे चांडाळांनो, आतां या चारुदत्ताला मारून टाका.

**चांडा०**—तुम्हांला घाई असली तर तुह्मी स्वतः मारा.

**रोह०**—( **पुढें सरून** ) अहो, तुम्ही मला मारा आणि माझ्या बापाला सोडा.

**शका०**—अरे ! पोराला आणि याला एकदम मारून टाका.

**चारु०**—हर हर !

**पद.** [ चाल—भिउं नको जिवलग सुंदरी. ]

**नीच असे खळ हा मोठा कपटी बोलतो तें, करिल सारें ॥ धृ० ॥ बाळा जाउनि काननभागीं मुनिच्या आश्रमिं राहे, जननिसंगें ॥ क्षणही राहुं नको ऐशा नगरामाजीं लाडक्या रे, सुख न लागे ॥ तुजला काळमुखीं देतिल वैरी मग तो तारणारा, कवण सांगे ॥ मित्रा तूंहि जा रे ॥ १ ॥**

**मैत्रे०**—मित्रा, तुला सोडून माझे प्राण कसे राहतील ?

**चारु०**—मित्रा, तुझे प्राण तुझ्या स्वाधीन आहेत. उगीच प्राणत्याग कां करितोस ?

**मैत्रे०**—( **मनांत** ) या मुलाला याच्या आईच्या स्वाधीन करावें आणि मग मित्राच्या भेटीला परलोकीं जावें. ( **उघड** ) मित्रा, या बाळाला घेऊन जातों. [ जातात ]

**शका०**—अरे, मीं तुम्हांला सांगितलेंना कीं, या दोघांना मारून टाका म्हणून ? तो पोरगा चालला पहा.

**चांडा०**—तुम्ही सांगतां, पण आम्हांला तशी राजाज्ञा नाहीं. ( **सोबत्यास** ) अरे हें दवंडी पिटण्याचें तिसरें ठिकाण. तूं अपराध बोल; मी दवंडी वाजवितों. [ **तसें करितात.** ]

**शका०**—अजून लोकांना खरें वाटत नाहीं काय ? [ **उघड** ] अरे चारुदत्ता, लोकांना खरें वाटत नाहीं म्हणून तूं आपल्या तोंडानें मीं वसंतसेनेला मारली असें म्हण.

**चारु०**—[ **कांहीं बोलत नाहीं** ].

**शका०**—अहो चांडाळांनो, मीं सांगितल्याप्रमाणें हा बोलत नाहीं, बघतां काय, उडवा यांच्या पाठीवर कोरडे.

**चांडा०**—[ **चाबूक उगारून** ] बोलरे, चारुदत्ता बोल.

**चारु०**—[ **गहिंवरून** ]—

## दिंडी.

**पावलों मी या दुःखसागरातें ॥**
**खेद त्याचा किमपिही नसे मातें ॥**
**दुःख मोठें हें मला वदूं कैसें ॥**
**मारिली म्यां प्रियसखी आज ऐसें ॥ १ ॥**

**चांडा०**—[ **पुनः कोरडे उगारतात** ].

**चारु०**—लोकहो [ ‘ **इहपरलोकाविषयीं** ’ **इत्यादि पूर्वोक्त साकी म्हणतो.** ]

**शका०**—मारली हेंच कीं नाहीं ! मारली.

चारु०-बरें, तसें म्हण.

चांडा०-( दुसऱ्यास ) अरे आजची पाळी तुझी !

चांडा०-नाहीं तुझीच.

चांडा०-बरें तर, मला दोन घटका थांबलें पाहिजे. कारण माझा बाप मरतेवेळीं मला म्हणाला कीं, ज्या वेळेस तुझ्यावर वध करण्याची पाळी येईल, त्या वेळेस तूं एकदम वध करूं नको. कारण कोणी साधुपुरुष द्रव्य देऊन वध्यास सोडवितो; किंवा राजास पुत्र झाला तर वध्य मुक्त होतो, अथवा राज्याची उलटापालट झाली तर सर्वच बंदिवान मुक्त होतात.

शका०-काय, राज्याची उलटापालट !

चांडा०-अहो, हा उगीच तर्क आहे.

शका० अरे, या चारुदत्ताला लवकर मारा. ( चेटाला घेऊन जातो पण पुनः परत येऊन ) मी जाणार होतों, पण जात नाहीं.

चांडा०-आर्या चारुदत्ता, राजाज्ञा तुला मारते. वधस्थान जवळ आलें. तुला कोणाचें स्मरण कर्तव्य असेल तर कर.

चारु०-ह्या समयीं धर्मावाचून कोणाचें स्मरण करूं!-

पद. ( चाल—उभि जवळि. )

**जरि असे धर्म मम साचा या समयीं मजला पावो ॥**
**मजवरी दोष हत्येचा आला तो मिथ्या होवो ॥ चाल ॥**
**ती माझी प्रियसुंदरी ॥ त्यजुनि सुरपुरी ॥ तशिच भूवरी ॥**

—अहो चांडाळहो, आतां मी कोणीकडे जाऊं ?

चांडा०-हें पहा जेथें अर्धें प्रेत लोंबत आहे, आणि ज्याला कोल्हीं, लांडगे ओढीत आहेत अशा या दक्षिण स्मशानांत चल.

चारु०-हाय हाय ! आतां मात्र मी मंदभाग्य मेलों खचित !

शका०-अरे हा चारुदत्त खालीं बसला.

चांडा०-चारुदत्ता, भ्यालास वाटतें ?

चारु०-हा मूर्खांनो ! मी मरणाला भित नाहीं; परंतु माझ्या कीर्तीला कलंक लागला हो !

चांडा०-आर्या चारुदत्ता, गगनांगणांत वास करणारे चंद्रसूर्यही विपत्ति

पावतात मग मरणधर्म मनुष्याची काय कथा आहे ? या जगात जो चढतो, तो पडतो, आणि जो पडतो तोच उठतो; असें चाललेंच आहे. ( **दुसऱ्यास** ) अरे हें दवंडी पिटण्याचें चौथें ठिकाण. तूं अपराध बोल. मी दवंडी वाजवितों. ( **तसें करितात** ) चारुदत्ता, तुझा मरणसमय जवळ आला, आतां कोणाचें स्मरण कर्तव्य असेल तर कर.

**चारु०**—देवतांची इच्छा. भगवति देवते—

## साकी.

असेल माझा धर्मसखा तरि या समयीं मज पावो ॥
प्रिय सुंदरि ती ताराया मज झडकरि धावुनि येवो ॥
जावो दोष दुरी ॥ राहो सुकीर्ति शुद्ध खरी ॥

**चांडा०**—( **तलवार उगारून** ) चारुदत्ता, वर छाती करून ताठ उभा रहा, म्हणजे एका घावानें तुझा शिरच्छेद करून तुला स्वर्गाला पाठवितो. ( **उगारलेली तलवार खालीं पडलीसे पाहून** ) अरे, इतकी घट्ट धरली असून जेव्हां तरवार पडली, तेव्हां चारुदत्ताचें मरण टळलें असेंच वाटतें. हे भगवति सह्याचलवासिनी देवि रेणुके, जर कृपा करून या चारुदत्ताचा प्राण वांचविलास तर आमच्या चांडाळकुळावर अनुग्रह केल्याप्रमाणें होईल.

**दु० चांडा०**—अरे राजाज्ञेप्रमाणें आपल्याला केलें पाहिजे. याला आतां शूळावर चढवूं. ( **तसें करूं लागतात.** )

**वसंत०**—( **दुरून** ) अहो ! थांबा, थांबा ! जिच्याकरितां तुम्ही या पुरुषाचा प्राण घेतां आहां ती मी वसंतसेना जिवंत आहें.

**चांडा०**—( **आश्चर्यानें** ) अरे ही केश मोकळे सोडलेली " थांबा थांबा " म्हणत कोण येत आहे बरें ?

**वसंत०**—( **प्रवेश करून** ) आर्या चारुदत्ता, काय हें ? ( **असें म्हणून त्याच्या अंगावर पडते.** )

**शका०**—अरे ही जिवंत कशी झाली ? आतां येथें राहून उपयोगी नाहीं. ( **जातो** )

**चांडा०**—काय ही वसंतसेना ? बरें झालें कीं आम्हीं हा साधु मारला नाहीं. ( **दुसऱ्यास** ) अरे वसंतसेना जिवंत आहे हें वर्तमान राजाला कळीव.

जा. [ इकडे तिकडे पाहून ] आम्हांला राजाची अशी आज्ञा आहे कीं, ज्यानें वसंतसेनेला पीडा दिली त्यास मारावें. तर तो राजशालक कोठें गेला, त्याला शोधून आणला पाहिजे. [ जातो. ]

चारु०—[ विस्मयानें ]—

पद. ( चाल—तुझें पाहुनि स्वरूप. )

हें बघुनि वदन बहु पडे भ्रांति ॥ मज काळमुखांतुनि
मुक्त करूं ये, कुठुनि धांवत अवचित ही सुदती ॥ धृ० ॥
प्रियसखि ही दुसरी काय ॥ अथवा ती मृत न होय ॥
किंवा हा दिव्य काय ॥ धरुनि वरुनि भूवरि उतरलि ती ॥

वसंत०-[ साश्रु ]—

पद. ( चाल—अया मास असाड. )

आर्या तीच असे पदाची दासी ही हतभागिनी ॥
जिच्या वधाचा दोष लावियला तुम्हां पौरजनांनीं ॥ १ ॥
कुदशा ऐशी तुम्हांसि आली कारण तिस ही पापिणी ॥
क्षमा करा अपराध दयाळा विनवित मी कर जोडुनि ॥ २ ॥

चारु०—होय, तीच ही वसंतसेना. ( न्याहाळून )

पद. ( चाल—येरी माई येरी माई. )

लोचनांबुधारांनीं हे पयोधर ओले ॥ कोठुनि आलिस मज ताराया ॥ मृत पुरुषा जशि संजिवनि ये झट उठवाया ॥ धृ० ॥ तुजसाठीं जो बंध पावला ॥ तोचि देह त्वां विमुक्त केला ॥ प्रिय संगतिचा प्रभाव कळला ॥ जीवित मजला पुनरपि आलें ॥ १ ॥

—आणखी पहा प्रिये, आज काय चमत्कार झाला तो !—

पद. ( चाल—प्रिये पहा. )

प्रिये कशी दैवाची चित्रकथा अशुभचि शुभ झालें ॥ धृ० ॥
रक्तकुसुमहार गळां ॥ रक्तांबर रक्तटिळा ॥
लग्नवरा तेंवि मला ॥ वाटें कीं सजविलें ॥ १ ॥
लग्नवाद्यनाद जसा ॥ वध्यपटहनाद तसा ॥
श्रवणीं ये मंजुळसा ॥ सौख्य मनीं दाटलें ॥ २ ॥

**वसंत०**--आर्या, तुम्ही अतिदक्ष असून असें कसें झालें ?

**चारु०** -प्रिये--

## साकी.

जन्मांतरिचा बलिष्ठ वैरी दुर्दैवें उद्भवला ॥
नरकीं पडतां आपण त्यानें मजला स्पर्शचि केला ॥
म्हणुनि असें झालें ॥ विधिचें चरित्र तें कळलें ॥ १ ॥

**वसंत०**--शिव शिव ! त्या मेल्या राजशालकानें मला मारिलें. मेलेंच होतें, पण आपल्या पुण्यानें वांचलें.

**चारु०** -[ भिक्षूस उद्देशून ] हा कोण ?

**वसंत०**--ज्यानें मला वांचविलें तो हा.

**चारु०**--कारणावांचून बंधुत्व करणारा असा तूं धर्मात्मा कोण आहेस ?

**भिक्षु**--मला आपण ओळखलें नाहीं वाटतें ? आपल्या चरणांचें संवाहन करणारा तो मी. या उपासिकेनें मला द्यूतकारांपासून सोडविलें--अथवा विकत घेतलें असें म्हणाना !--त्या दिवसांपासून मी भिक्षु झालों. ही वसंतसेना गाडीची अदलाबदल झाल्यामुळें पुष्पकरण्डकजीर्णोद्यानांत गेली. तेथें राजशालक होता, त्यानें " तूं माझ्यावर सुप्रसन्न होत नाहींस " असें म्हणून तिला बाहुपाश घालून मारलें तें मीं प्रत्यक्ष पाहिलें. नंतर माझ्याकडून जेवढें साहाय झालें तेवढें मीं केलें.

**चारु०**--दुर्जनाच्या ठिकाणीं सर्व कांहीं संभवतें. त्यानें आपलें दुष्कर्म माझ्यावर घालून मला प्राणसंकटांत घातलें होतें, परंतु तुम्हीं वेळेवर येऊन वांचविलेंत.

( पडद्यांत ) " आर्यकराजाचा विजय असो ! "

## श्लोक.

दक्षाध्वरा मथुनियां जय शंकराचा ॥
कीं क्रौंच दानव विदारुनि षण्मुखाचा ॥
जंभास मारुनि जसा जय वासवाचा ॥
झाला तसाच अरि मर्दुनि आर्यकाचा ॥ १ ॥

**शर्विलक**-( **येऊन** ) त्या दुष्ट पालकाचा वध करून त्याच्या जागीं आर्यकाला बसवून त्याची सत्ता सर्वत्र स्थापन केली. आतां त्या श्रेष्ठ चारुदत्ताला सोडवितों. ( **पुढें पाहून** ) वाहवा ! आर्यकराजाचे हेतु सफल झाले ! हाच तो श्रेष्ठ चारुदत्त--

## दिंडी.

व्यसनसिंधूंतुनि ज्यास गुणवतीनें ॥
तारियेलें धरुनियां निज करानें ॥
अशा श्रेष्ठा पाहतों प्रियायुक्ता ॥
चंद्रिकेसह विधुस कीं राहुमुक्ता ॥ १ ॥

—परंतु या सत्पुरुषाचा मीं महान अपराध केला आहे, तेव्हां याच्यापुढें कसा जाऊं ? कांहीं चिंता नाहीं, हा सत्पुरुष आहे, क्षमा करीलच. ( **पुढें होऊन** ) आर्या चारुदत्ता--

**चारु०**--तूं कोणरे बाबा !

**शर्वि०**--आर्या--

## साकी.

ज्यानें फोडुनि सदन तयांतुनि अलंकार दुसऱ्याचे ॥
नेणुनि केलें स्वार्थासाठीं रात्रीं हरण तयाचें ॥
तो मी शरण तुला ॥ आलों देई अभयाला ॥ १ ॥

**चारु०**—**छे छे** ! मित्रा, असें म्हणूं नकोस. तूंच मला स्नेहाचा अपूर्व लाभ जोडून दिलास. ( **आलिंगन देतो.** )

**शर्वि०**—आर्या, तुम्हांला कांहीं अत्यानंदाचें वर्तमान सांगावयाचें आहे. तुमच्या यानांत बसून पूर्वी जो तुम्हांला शरण आला होता, त्या आर्यकानें, पालकराजाचा वध करून, आपण राज्यपदावर बसून तुमच्या उपकाराबद्दल कुशावती नगरीचें स्वामित्व तुम्हांला दिलें आहे. या स्नेहभावाच्या पहिल्या देणगीचा आपण स्वीकार करावा, अशी आर्यकाची विनंति आहे. कोण आहेरे, आणा त्या पापी राष्ट्रीयाला धरून. आर्या, आणखी आर्यकराजाची विनंति आहे कीं, हें राज्य मीं आपल्या गुणांनीं संपादन केलें आहे, तर याचा आपण हवा तसा उपभोग घ्यावा.

चारु०—माझे कसले गुण ?

( पडद्यांत ) " अरे पापी राष्ट्रीया, भोग भोग आपल्या कर्मांचीं फळें. "

[ शकाराला पुढें आणतात ]

शका०—मला चोहोंकडून कसें वेढलें आहे पहा ! आतां कसें करावें ? या श्रेष्ठ चारुदत्तालाच शरण जावें. ( पायां पडतो. )

[ पडद्यांत " आर्या, सोड सोड त्याला. " ]

शका० – हे पुण्यपुरुषा, माझें रक्षण कर.

चारु०—शरणागताला अभय आहे.

शर्वि०—अरे याला एकीकडे ओढून. ( चारुदत्तास ) याला सोडायचें नाहीं. कोणतें शासन करूं सांग—

पद. ( चाल—केशिदानव. )

चरणिं करिच्या बद्ध करुनि ॥ प्राण घ्यावा काय ओढुनि ॥
श्वानिं खावें यास फाडुनि ॥ काय सांगावें ॥ १ ॥
लोहशूलावरी चढवुनि ॥ वधावें कीं यास नेउनि ॥
करवतानें बळें कापुनि ॥ काय मारावें ॥ २ ॥

चारु०—मी सांगेन तसें करशीलना ?

शर्वि०—करीन; पण लवकर सांगा.

शका०—आर्या चारुदत्ता, मी शरण आहें. पुनः असें करणार नाहीं.

वसंत०—मेल्या ! तुझा सत्यनाश होवो. [ चारुदत्ताच्या गळ्यांतील माळ त्याच्या अंगावर टाकते. ]

शका०—अगे गर्भदासी, मी तुला पुनः मारणार नाहीं.

शर्वि०—अरे पाहतां काय ? ओढा याला. आर्या, काय करूं सांग.

चारु० –मी सांगेन तसें करशील ना ?

शर्वि०—करीन.

चारु०—तर मग याला लौकर—

शर्वि०—काय ठार मारूं ?

चारु०—नाहीं नाहीं, सोडून द्या.

शर्वि०—तें कां ?

चारु०—अरे असें आहे—



चारु०--नाहीं. नाहीं, सोडून द्या! ( पृ. ११४ )

## साकी.

अपराधातें करुनि अरि जरी चरणिं शरण येवोनी ॥
तारावें मज असें म्हणे तरि न वधावा शस्त्रांनीं ॥
त्यातें उपकारें ॥ वधावें हेंचि सन्मत खरें ॥ १ ॥

**शर्वि०**—तुह्मी सोडा म्हणतां तर सोडतों.

**शका०**—वाहवा ! काय मौज झाली ! मी मेलेला वांचलों ! ( **उड्या मारीत जातो.** )

( **पडद्यांत** )( " अरे, ही चारुदत्ताची पत्नी धूता आपला पुत्रा रोहसेन याला एकीकडे लोटून अश्रुपात करीत निग्रहानें अग्नीपुढें उभी आहे व आतां प्रवेश करणार. " )

**शर्वि०**—चंदनका, कसलीरे गडबड आहे ?

**चंद०** –( **बाहेर येऊन** ) राजवाड्याच्या दक्षिणेच्या बाजूला लोकांची फार दाटी झाली आहे. त्या बाईना आम्ही पुष्कळ सांगितलें कीं, चारुदत्त जिवंत आहे पण ऐकतो कोण ?

**चारु०**—( **दुःखानें** ) प्रिये, मी जिवंत असतां काय करितेस हें ?

( **मूर्च्छित होतो.** )

**शर्वि०**—शिव शिव ! इतका प्रयत्न करून व्यर्थ होतो कीं काय ?

**वसंत०**—आर्या, सावध व्हा. तिकडे न गेलां तर एखादें भलतेंच व्हावयाचें !

**चारु०**—( **सावध होऊन** ) हा प्रिये ! कोठें आहेस ?

**चंद०**—आर्या, मी दाखवितों, इकडून ये. ( **सर्व जातात** ).

( **अग्नीपुढें उभी आहे अशी धूता, रोहसेन, मैत्रेय व रदनिका येतात.** ).

**धूता**—वत्सा, मला ओढूं नकोस, सोड सोड. माझ्या धर्मकृत्याला आड येऊं नको. स्वारीची अमंगल वार्ता ऐकून माझ्यानें कसें राहवेल ?

**रोह०**—आई, मला टाकून तूं कोणीकडे जातेस ? मलाही घेऊन चल.

**मैत्रे०**—बाई, तूं ब्राह्मणी आहेस. ब्राह्मणीनें भिन्न चिता करूं नये, केल्यास दोष आहे, असें शास्त्रांत सांगितलें आहे.

**धूता**—पतीची अमंगल वार्ता ऐकण्यापेक्षां तो दोष मला पत्करला.

**शर्वि०**—आर्या चारुदत्ता, तुमची स्त्री अग्नीपुढें उभी आहे. त्वरा करा.

**धूता**—रदनिके, तूं तरी या बाळाला संभाळ !

**रद०**—बाईसाहेब, तुम्ही जातां आणि मी या बाळाला संभाळूं काय ? नाहीं नाहीं; मीही मागून येणार.

**धूता**—मैत्रेय भटजी, तुह्मी तरी या बाळाला संभाळा.

**मैत्रे०**—बाई, जो कोणी इष्टसिद्धीस प्रवृत्त होतो तो ब्राह्मणाला पुढें करितो. म्हणून आधीं मी जातों.

**धूता**—माझ्या बाळाचा संभाळ करण्याचें दोघांनीं नाकारिलें. असो; बाळा, आतां तुझें तूंच रक्षण कर. आम्हांला तिलोदक द्यायला तूं पाहिजेस. सर्व मनोरथ मेले जागच्या जागीं राहिले. पित्यानें संभाळ करावा असें तुझ्या नशीबींच नाहीं.

**चारु०**—( **पुढें होऊन** ) हा पहा मींच माझ्या बाळाला संभाळतों.

**धूता०**—अग बाई, हा स्वामींचा शब्द ! ( **पाहून** ) होय; तेच हे ! ( **चारुदत्तास आलिंगिते** ).

**रोह०**—माझ्या बाबानें मला उचलून घेतलें. बघ आई, बाबा आतां माझ्या आईला जाऊं देऊं नकोस.

**चारु०**—प्रिये—

**पद.** ( चाल—आवडति वस्तु लोभानें. )

**हा असुनि सजिव पति कांते ।। करिसी साहस कां मज न कळे तें ।। धृ० ।। अस्ताचळिं तो रवि नच जातां ।। नच मिटि कमलिनि निज नयनातें ।। १ ।।**

**धूता०**—म्हणूनच तिला अचेतन म्हणतात.

**मैत्रे०**—हा केवळ या पतिव्रतेचा प्रभाव. अग्निप्रवेश करण्याच्या निश्चयानेंच हा पतिसमागम पावली. मित्रा, तुझा जयजयकार असो.

( **दोघे भेटतात.** )

**रद०**—महाराज, मी रदनिका वंदन करतें.

**चारु०**—रदनिके, ऊठ.

धूता० – ( वसंतसेनेस ) मी मोठ्या भाग्याची म्हणून तुम्ही मला भेटलां.

वसंत०—आतां मला किती आनन्द झाला आहे म्हणून सांगूं !

शर्वि०—आर्य, वसंतसेने, नवा राजा बंधुप्रेमानें तुझ्यावर संतुष्ट झाला.

वसंत०—मी कृतार्थ झालें.

शर्वि०—आर्या, या भिक्षूचें काय करावयाचें ?

चारु०—कां भिक्षो, तुम्हांला काय प्रिय आहे ?

भिक्षु०—हें सर्व क्षणभंगुर, अनित्य विनाशी असें पाहून मला दुप्पट वैराग्य झालें आहे. तर याच आश्रमांत सत्कालक्षेप करावा, हेंच मला प्रिय आहे.

शर्वि०—ठीक आहे, तर यांस सर्व मठांचें आधिपत्य द्यावें.

चारु०—का भिक्षो ?

भिक्षु—यांत माला संतोष आहे.

शर्वि०—या स्थावरक चेटाचें काय करावयाचें ?

चारु०—तो दास्यत्वापासून मुक्त व्हावा; तसेंच या चांडाळांना सर्व चाडाळांचे नाईक करावे; चन्दनक याला सर्व राष्ट्राच्या पालनाचा अधिकार असावा व आमचा आदिमित्र जो राजशालक त्याच्याकडे पूर्वीचेंच काम असावें.

शर्वि०—ठीक आहे; आणखी मीं आपलें काय प्रिय करावें ?

चारु० –

पद. ( चाल–उठि प्रभात सुमरलियो )

सकल दोष मजवरिचा आज लया गेला ॥
वैरि चरणिं शरण तया मुक्तिलाभ झाला ॥ धृ० ॥
आर्यक मम मित्र त्यासि नृपपद तें आलें ॥
प्रियसखिचा लाभ तसें त्वांहि साह्य केलें ॥
प्रिय याहुनि अधिक काय राहिलें मला ॥ १ ॥

—तथापि हे असो.—

पद ( चाल–प्राप्त होय जें निधान )

धेनु पयोदा असोत वसुधा तृणधान्या देवो ॥
सुखद पवन तो नित्य सुटोनी वृष्टि समयिं होवो ॥ धृ० ॥

धर्मनिष्ठ रणशूर भूप ते बलरिपु दंडोनि ॥
करोत वसुमतिचें परिपालन रात्रंदिन जपुनी ॥
निजकर्मी रत असोत जनही नीतिपथा धरुनि ॥
नाट्यकलाही सकलकलांसह पूर्णत्वा येवो ॥ १ ॥

---

## ईशस्तवन

पद. ( राग भूप, त्रिताल. )

शंकरा पामर हा नर सादर शरण तुम्हा, तारा ॥ धृ० ॥
भीषण वाया; तनु शिणवाया तें नासाया पंथ खरा ॥
मूढा दावा; भ्रम निरसावा, बोध ठसावा, मनीं बरा ॥
जो चुकविल जननमरणाचा फेरा, उमावरा ॥ १ ॥
मिथ्या हा भव, मायासंभव, ऐसा अनुभव घेउनिया ॥
नित्यनिरंजनिं, मन लावोनी, अवमानिति मुनि संसारा ॥
तो अनुभव मजशी यावा सत्सारा, तमोहरा ॥ २ ॥
कवितासुमनें, हीं शुद्धमनें, निरहंमतिनें, वाहियलीं ॥
बल्लाळात्मज गोविंदानें सुप्रेमानें मान्य करा ॥
भो शीतलशशिशेखर, शूलधरा, पीतगरा ॥ ३ ॥

समाप्त.